

**प्रा. वा. ल. कुळकर्णी**
**यांची पुस्तके**

वामन मल्हार : वाङ्मयदर्शन
वाङ्मयातील वादस्थळे
वाङ्मयीन मते आणि मतभेद
वाङ्मयीन टीपा आणि टिप्पणी
श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन
वाङ्मयीन दृष्टि आणि दृष्टिकोण
साहित्य आणि समीक्षा
नाटककार खाडिलकर

# मराठी ज्ञानप्रसारक
## इतिहास व वाङ्मयविचार

वा. ल. कुलकर्णी



पॉप्युलर प्रकाशन

‘विविधज्ञानविस्तार’पूर्व कालातील वाङ्मयविचाराचे स्वरूप लक्षात घेण्यासाठी १८६७च्या अगोदरील नियतकालिकांचे अंक मी चाळू लागलो आणि ‘मराठी ज्ञानप्रसारक’ मधील महत्त्वपूर्ण लेखन माझ्या वाचनात आले. हे लेखन नजरे-खालून घालीत असता १८४८ ते १८६७ मधील महाराष्ट्रातील शैक्षणिक आणि वाङ्मयीन जीवनावर केवढा तरी नवा लक्षणीय प्रकाश पडत आहे हे माझ्या लक्षात आले. ज्या स्टूडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीची शाखा म्हणून ‘मराठी ज्ञानप्रसारक’ प्रकाशित करणाऱ्या उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभेचा उदय झाला त्या जनकसभेच्या कार्यासंबंधी मनात स्वाभाविकच विलक्षण कुतूहल निर्माण झाले; व तेवढ्यासाठी ठिकठिकाणांहून मिळत गेलेल्या माहितीचे कण गोळा करीत गेलो. ही माहिती गोळा करीत असताच अशा प्रकारचे ज्ञानार्जनाचे आणि ज्ञानप्रसाराचे प्रयत्न हिंदुस्थानातील इतर प्रांतांमध्ये ह्याच वेळी कोठे कोठे व कितपत झाले हे पाहण्याची इच्छा बळावली व त्या दृष्टीने बंगाल, गुजरात व इतर प्रांत यांचे अर्वाचीन काळाचे साहित्येतिहास आणि समाजेतिहास शोधले आणि अनेक जाणत्यांशी पत्रव्यवहार केला. तेव्हा बंगालखेरीज इतर भारतीय प्रांतांमध्ये अशा प्रकारचे प्रयत्न ह्या काळात झाले असल्याचे उल्लेख सापडत नाहीत असे दिसून आले. बंगालमध्ये झालेल्या समान चळवळींची मात्र बरीच महत्त्वाची माहिती हाती आली. अशा रीतीने जमविलेली ही सर्व माहिती आणि ‘मराठी ज्ञानप्रसारका’चे वाचन करीत असता काढलेली टिपणे उपयुक्त वाटल्यावरून त्यातील महत्त्वाची एकत्र करावीत असे ठरविले. ह्या छोट्या पुस्तकाचा जन्म अशा प्रकारे झाला. त्यातील मजकुराचे स्वरूप माहितीवजा आहे. स्टूडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी ही जनकसभा आणि तिच्या पारशी, गुजराती व मराठी शाखासभा ह्यांनी एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर जे ज्ञानार्जन आणि ज्ञानप्रसार ह्या क्षेत्रात अत्यंत महत्त्वपूर्ण कार्य केले त्यासंबंधीचा तपशील एकत्र जमा करण्याचा प्रयत्न अद्याप तरी मराठीत झालेला दिसत नाही. त्या दृष्टीने ह्या

प्रयत्न महाराष्ट्राचा एकोणिसाव्या शतकाचा सांस्कृतिक इतिहास लिहू पाहणाऱ्यांना उपयुक्त ठरेल अशी अपेक्षा आहे.

'मराठी ज्ञानप्रसारका'त विविध ज्ञानशाखांमध्ये कोणकोणत्या प्रकारचे महत्त्वाचे लेखन प्रसिद्ध झाले ह्याची रचना प्रकरण क्रमांक दोनला जोडलेल्या याद्यांवरून वाचकांना चांगली यावी. 'मराठी ज्ञानप्रसारका'त इतर लेखनाबरोबरच कथा आणि प्रवासवर्णन ह्या प्रकारात मोडणारेही लक्षणीय लेखन आढळते. त्यातील 'नवल कथा' ह्या नावाने प्रसिद्ध झालेल्या लेखनाचा परिचय मी दोनतीन वर्षांपूर्वी 'सत्यकथे'च्या वाचकांना करून दिला होता. त्याचप्रमाणे 'ज्ञानप्रसारका'त प्रसिद्ध झालेल्या काही प्रवासवर्णनांसंबंधी 'रहस्यरंजन' व 'मराठी नवनीत' ह्या नियतकालिकांमध्ये माहितीवजा टिपणे प्रसिद्ध केली होती. त्यात आणखी काही महत्त्वाच्या माहितीची व टिपणांची भर घालून ती परिशिष्टात समाविष्ट केली आहेत.

ज्या 'विस्तार'पूर्व वाङ्मयविचाराच्या शोधार्थ मी मूलतः हा उद्योग आरंभिला तो विचार तपशीलाने तिसऱ्या प्रकरणात नोंदला आहे. वाङ्मयाभ्यासकास तो मोलाचा वाटेल असा विश्वास वाटतो.

स्टु. लि. अॅ. सा. सोसायटीच्या गिरगांव, मुंबई येथील मुलींच्या शाळेच्या मुख्याध्यापिकांनी सोसायटीच्या १९४८ साली झालेल्या शतसांवत्सरिक उत्सवानिमित्त प्रसिद्ध केलेला अहवाल मला उपलब्ध करून दिला ह्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. पुस्तकाची परिशिष्टे तयार करणाच्या कामी मराठवाडा विद्यापीठातील मराठी विभागाचे संशोधन साहाय्यक श्री. अरविंद थिटे यांनी जे बहुमोल साहाय्य केले त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे माझे कर्तव्य आहे. हा अभ्यास करीत असता नेहमीच्याच आपुलकीने मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय व मुंबई विद्यापीठ ग्रंथालय ह्यांनी मला मदत केली. त्याबरोबरच गुजराती फॉर्बस सभा आणि इतर अनेक संस्था व व्यक्ती ह्यांचे मला बहुमोल साहाय्य झाले. ह्या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे.

मराठवाडा विद्यापीठ
औरंगाबाद (द.)
१७-१२-१९६५

वा. ल. कुळकर्णी

प्रकरण पहिले

# ‘दी स्टूडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी’

एकोणिसावे शतक हे अनेक दृष्टींनी राष्ट्रीय पुनरुत्थानाचे शतक आहे. ज्ञानार्जनाच्या बाबतीत मागे पडलेला, नव्या ज्ञानाला व विज्ञानाला पारखा झालेला आणि इंग्रजी सत्तेखाली गेलेला भारतवर्ष ह्या शतकात पुनश्च जागृत झाला. इंग्रजी सत्तेबरोबर आलेल्या पाश्चात्त्य विद्येच्या आणि संस्कृतीच्या परिचयाने आणि प्रभावाने ही जागृती आली. नव्या शिक्षणाबरोबर मिळालेल्या नव्या ज्ञानाने एकदम डोळे उघडले. ह्या झोप उडालेल्या डोळ्यांना प्रथम दिसले ते पाश्चात्त्यांचे प्रचंड ज्ञानभांडार. त्यांतील अनेक विभागांतील ज्ञानाची तेजस्विता व नवता त्यांना जाणवली. आणि हे ज्ञानभांडार हाती लागताच त्यातील किती घेऊ आणि आपल्याबरोबरच दुसऱ्याला देऊ असे ह्या इंग्रजी ‘वाघिणीचें दूध’ प्राशन करू शकलेल्या नव्या मंडळींना होऊन गेले. ज्ञानपिपासा वाढली, आपल्या अज्ञानाची लाज वाटू लागली, भोवतालचा अंधार दूर होऊन सर्वत्र ज्ञानप्रकाश पडला पाहिजे अशी तळमळ लागली; आणि विविध मार्गांनी हे ज्ञानार्जनाचे आणि ज्ञानप्रसाराचे कार्य करण्यासाठी व्यक्ती आणि संस्था पुढे सरसावल्या.

बंगालप्रमाणे महाराष्ट्रातही हा चमत्कार दिसला. बंगाल इंग्रजांच्या स्वाधीन लवकर झाला होता आणि त्यामुळे बंगालने इंग्रजी विद्या महाराष्ट्राच्या मानाने बरीच अगोदर चाखली होती; स्वाभाविकच ज्ञानार्जन आणि ज्ञानप्रसार ह्यांच्याशी संलग्न असणाऱ्या आणि त्यामधून उद्भवलेल्या अनेक चळवळींचा

जन्म बंगालमध्ये महाराष्ट्राच्या अगोदर झाला ह्यात नवल नाही. परंतु लवकरच ह्या अनेक बाबतींत महाराष्ट्राने बंगालच्या पाउलावर पाऊल टाकले आणि एकोणिसावे शतक उलटण्याच्या आत बंगाल आणि महाराष्ट्र राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या ह्या देशव्यापी चळवळीत जवळजवळ सारख्याच आघाडीवर आहेत असा देखावा दिसू लागला.

बंगाल आणि महाराष्ट्र ह्या दोन्ही प्रांतात ज्ञानार्जन आणि ज्ञानप्रसार ह्यांच्या क्षेत्रात झालेल्या चळवळींचे एक वैशिष्ट्य असे की, ह्यातील अनेक चळवळी सामूहिक स्वरूपाच्या होत्या. व्यक्तिगत प्रयत्न होत नव्हते असे नाही, परंतु सामूहिक प्रयत्न अधिक लक्षणीय आणि प्रभावी होते. अनेक मने एकाच ध्येयाने आणि विचारसरणीने प्रभावित व्हावीत आणि त्यांनी त्यांच्या सिद्धीकरिता आस्थेने, नेटाने व एक प्रकारच्या जिद्दीने कार्यप्रवृत्त व्हावे हा नवा चमत्कार दिसू लागला होता. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात लोकशिक्षण आणि लोकजागृती ह्यांसाठी जे एकामागून एक संघटित प्रयत्न झालेले दिसतात आणि ज्यातून अशा प्रकारच्या प्रयत्नांची एक उज्ज्वल परंपराच पुढे महाराष्ट्रात निर्माण झाल्यासारखी दिसते त्याची नांदीच ह्या शतकाच्या पूर्वार्धात गायिली जात होती. महाराष्ट्रात झालेल्या असल्या प्रयत्नांपैकी एका प्रयत्नाची थोडी हकीकत पुढे देत आहे.

हा प्रयत्न लक्षणीय ठरतो तो अशा दृष्टीने की, तो शिक्षक आणि विद्यार्थी यांनी मिळून केलेला सामूहिक प्रयत्न होता. महाराष्ट्रात झालेल्या ह्या प्रयत्नाचे उगमस्थान बंगालमध्ये आढळणाऱ्या थोड्याफार तत्समान प्रयत्नात दिसत असले तरी येथे त्याने धारण केलेले रूप आणि त्याची येथील एकंदर फलश्रुती लक्षात घेता बंगालमधील प्रयत्नांपेक्षाही सदर प्रयत्न अधिक महत्त्वपूर्ण ठरतो असे आढळून येते.

महाराष्ट्र आणि बंगाल ह्यांमधील ज्या प्रयत्नांचा मी येथे उल्लेख करीत आहे ते कलकत्ता व मुंबई येथे तेथील विद्यापीठे स्थापन होण्यापूर्वी म्हणजे १८५७ च्या अगोदरच झालेले प्रयत्न आहेत, हे सदर प्रयत्नांचे लक्षात घेण्याजोगे वैशिष्ट्य आहे. त्यातील महाराष्ट्रात झालेल्या महत्त्वपूर्ण प्रयत्नाकडे वळण्यापूर्वी बंगालमधील तत्समान प्रयत्नांची प्रथम तोंडओळख करून घेणे इष्ट ठरेल.

शिक्षक आणि विद्यार्थी ह्यांनी एकत्र येऊन ज्ञानवृद्धीचा केलेला बंगालमधील

पहिला लक्षणीय प्रयत्न म्हणजे कलकत्ता येथे १८२७।२८ मध्ये स्थापन करण्यात आलेली The Academic Association ही विद्यासभा होय. ही विद्यासभा प्रो० डिरोझियो ह्या प्रसिद्ध प्राध्यापकाने आपल्या विद्यार्थ्यांच्या सहकार्याने स्थापन केली होती. प्रो० डिरोझियो हाच त्या सभेचा अध्यक्ष होता आणि उमाचरण बोस हा तिचा कार्यवाह होता. प्रो० डिरोझियो हे नाव बंगालच्या एकोणिसाव्या शतकाच्या सांस्कृतिक इतिहासातील एक अत्यंत महत्त्वाचे नाव आहे. प्रो० डिरोझियो (१८०९–१८३१) हा कलकत्ता येथील हिंदू कॉलेजमध्ये १८२६ ते १८३१ च्या दरम्यान इंग्रजी आणि इतिहास ह्या विषयांचा प्राध्यापक होता. ह्या अल्पकाळांत त्याने तरुण बंगाली मनावर आपल्या व्यक्तित्वाची जी विलक्षण छाप पाडली होती तिला तोड नव्हती. ह्या विशीच्या घरातील तरुण प्राध्यापकाचे ग्रंथालय अद्ययावत ग्रंथांनी युक्त होते. प्रो० डिरोझियोने आपल्या विद्यार्थ्यांना विचार करायला शिकविले, खऱ्या अर्थाने त्यांना बुद्धिप्रामाण्य-वादाची दीक्षा दिली, त्यांची ज्ञानलालसा वाढीस लावली. तो विद्यार्थ्यांना कुमार्गाला लावतो असा आरोप त्याजवर ठेवून व त्याला स्वतःचा बचाव करण्याची संधीही न देता काढून टाकण्यात आले. Western Influence on Bengali Literature या प्रसिद्ध ग्रंथाचे लेखक प्रो० प्रियरंजन सेन यांनी त्याची तुलना सॉक्रेटिसाशी केली आहे.[1] प्रो० डिरोझियो यांच्या अध्यक्षत्वाखाली स्थापन झालेल्या The Academic Association ह्या सभेच्या बैठकी कलकत्ता येथे माणिकतोळा ह्या भागात सिंग कुटुंबाच्या बगीच्यात भरत. ह्या बैठकीत सभासदांनी लिहून आणलेल्या निबंधांचे वाचन व चर्चा होई. हे निबंध विविध विषयांवर असत आणि निबंधलेखकाला संपूर्ण मतस्वातंत्र्य असे. वेगवेगळ्या प्रश्नांवरील प्रचलित मतांपेक्षा अगदी वेगळी क्रांतिकारक मते सभासद निबंधांमधून आणि चर्चेतून व्यक्त करीत. The Academic Association मधील ह्या निबंधवाचनाला व चर्चांना एवढे महत्त्व प्राप्त झाले होते कीं, त्यांत व्यक्त झालेल्या मतांचा विचार करण्याकरिता कलकत्त्यात त्या काळी नवी नियतकालिके निघाली आणि सदर विद्यासभेचा आदर्श डोळ्यांपुढे ठेवून अनेक वादसभा स्थापन झाल्या. The Academic Association ची बैठक दर आठवड्यास भरत असे. प्रो० डिरोझियोच्या

---

१. पान ८२ पहा.

नंतर, ज्यांना बंगाली विचारवंत एतद्देशीय शिक्षणाचे जनक (The father of native education) अशी पदवी देतात ते हिंदू कॉलेजमधील दुसरे नामांकित प्राध्यापक डेव्हिड हेअर हे सदर सभेचे अध्यक्ष झाले व सभेची आठवडिक बैठक पुढे डेव्हिड हेअर यांच्याच शिक्षणसंस्थेत होऊ लागली. ही सभा किती वर्षे अस्तित्वात होती ह्यासंबंधीची निश्चित माहिती मिळत नाही; परंतु एवढे खरे की, ह्या सभेने १९ व्या शतकाच्या प्रारंभी बंगाली तरुणांमध्ये ज्ञानार्जनाची आवड आणि बुद्धिप्रामाण्यवादी दृष्टी निर्माण करण्याच्या दृष्टीने केलेले कार्य अत्यंत लक्षणीय आहे.

तरुणवर्गात ज्ञानार्जनाची आवड निर्माण करण्याच्या दृष्टीने ह्याच काळात कलकत्ता येथे स्थापन झालेल्या ज्या दुसऱ्या एका सभेने नामांकित कार्य केले तिचे नाव The Society for the Acquisition of General Knowledge (सामान्यज्ञानप्राप्त्यर्थ स्थापिलेली सभा) असेच होते. ही ज्ञानसंपादनार्थ स्थापन झालेली बंगाली सभा कलकत्ता येथे १८३८ मध्ये अस्तित्वात आली. तिच्या स्थापनेचा उद्देश सुशिक्षितांमध्ये व्यासंगबुद्धी वाढावी आणि विचारांची देवाण-घेवाण व्हावी हाच होता. ह्या सभेच्या उद्देशपत्रिकेखाली राम गोपाळ घोष, रामतनु लाहिरी इत्यादींच्या सह्या होत्या. ह्या विद्यासभेचे सदस्य मुख्यत्वेकरून प्राध्यापक आणि विद्यार्थीच होते. प्रत्येक सभासदावर निबंधवाचनाचे आणि व्याख्यान देण्याचे बंधन होते. निबंधवाचन करू न शकणाऱ्यास सभासद होता येत नव्हते. निबंधासाठी आणि व्याख्यानासाठी आपल्या आवडीचा विषय निवडण्याची सभासदांस पूर्ण मुभा होती. जो सभासद निबंधलेखन करू शकत नसे त्याला दंड होत असे. ह्या वादसभेची पहिली बैठक १२ मार्च १८३८, सोमवार रोजी सायंकाळी ७ वाजता संस्कृत कॉलेजच्या सभागृहात झाली. सभा स्थापन झाली त्या वेळी पटावर २०० सभासद होते. सभेपुढे वाचले जाणारे बहुतेक निबंध इंग्रजीत लिहिलेले असत. काही थोडे बंगालीत असत. इतिहास, काव्य, भाषा, सामाजिक सुधारणा, भूगोल, अध्यात्म, शरीरविज्ञान इत्यादी विविध विषयांवर निबंध लिहिले जात. रेव्ह. के. एम्. बानर्जी, राजनारायण बोस, पियारीनंद मित्र, ज्ञानेंद्रमोहन टागोर, प्रसन्नकुमार टागोर ही मंडळी सभेच्या कार्यात विशेष उत्साहाने भाग घेत. डेव्हिड हेअर हे सदर सभेचे प्रत्यक्ष सभासद नसले तरी आमंत्रित असत. पियारीनंद मित्र आणि रामतनु

लाहिरी हे तिचे सन्मान्य कार्यवाह होते. सभा महिन्यांतून एकदा संस्कृत कॉलेजात भरत असे. ह्या सभेचा प्रभाव एकंदर बंगाली तरुणवर्गावर एवढा पडला होता की, अनेक बंगाली तरुण अहमहमिकेने सभेचे सदस्य झाले होते. सभेपुढे वाचल्या गेलेल्या निबंधांत ज्ञानेन्द्रमोहन टागोर आणि किशोरचंद मित्र यांचे निबंध विशेष लक्षणीय असत असा उल्लेख आढळतो. ही सभा साधारण ६-७ वर्षे चालली आणि १८४३ च्या सुमारास बंद पडली असे दिसते. सभेच्या एका बैठकीत दक्षिणारंजन मुखर्जी यांनी ब्रिटिश शासनावर कडक शब्दांत टीका केल्यामुळे हिंदू कॉलेजचे प्राचार्य कॅप्टन रिचर्डसन यांचेबरोबर त्यांची बोलाचाली झाली व त्यानंतर सभेचे काम हळूहळू बंद पडले.

ह्याच संदर्भात कलकत्ता येथे स्थापन झालेल्या आणखी एका सभेचा उल्लेख करणे इष्ट ठरेल. ह्या सभेचे नाव 'दी बेथ्यून सोसायटी' (The Bethune Society) असे होते व ती डॉ. मौअट (Dr. Mouat) यांच्या सूचनेनुसार १८५१ च्या डिसेंबर महिन्यात स्थापन झाली होती. मेडिकल कॉलेजच्या सभागृहात ह्या सभेचा नामकरण समारंभ ता. १२ ऑगस्ट १८५१ रोजी झाला आणि बंगाल शिक्षण समितीच्या पूर्वाध्यक्षाचे नाव सभेला देण्यात आले. ह्या सभेचा प्रमुख उद्देश सुशिक्षित बंगाली तरुणांमध्ये वाङ्मयाबद्दल आणि विज्ञानाबद्दल अभिरुची निर्माण करणे आणि त्यांची बौद्धिक दृष्ट्या प्रगती होईल असे वातावरण निर्माण करणे हा होता. ह्याही सभेत निबंध वाचले जात आणि चर्चा व व्याख्याने होत. सभेची बैठक महिन्यातून एकदा होई. १८५९ साली ह्या सभेच्या अध्यक्षस्थानी डॉ. अलेक्झँडर डफ हे होते. ही विद्यासभा १८६३ पर्यंत उत्तम प्रकारे कार्य करीत होती. पुढे तिचे कार्य मंदावले; परंतु ती १८६९ पर्यंत अस्तित्वात होती असे दिसून येते.

ह्याच सुमारास ज्ञानार्जन व ज्ञानप्रसार ह्या क्षेत्रातील महाराष्ट्रात झालेल्या एका महत्त्वपूर्ण प्रयत्नाचे स्वरूप वर उल्लेखिलेल्या प्रयत्नांसारखेच थोडेबहुत असल्यामुळे त्यांचा येथे आवर्जून विस्ताराने उल्लेख केला. आता सदर प्रयत्नाकडे वळू : ज्ञानार्जन आणि ज्ञानप्रसार ह्यासाठी महाराष्ट्रात झालेला हा प्रयत्नही शिक्षक आणि विद्यार्थी यांनी एकत्र येऊन केला होता. ह्या प्रयत्नासाठी महाराष्ट्राने बंगालपासूनच स्फूर्ती घेतली हे त्या प्रयत्नाचे स्वरूप लक्षात घेता उघड दिसते; परंतु बंगालमधील प्रयत्नांपेक्षा महाराष्ट्रातील ह्या प्रयत्नाने साधलेले कार्य मात्र निश्चितपणे अधिक समाजोपयोगी ठरले.

महाराष्ट्रातील हा ज्ञानार्जन आणि ज्ञानवृद्धी ह्यांसाठी झालेला पहिला सामूहिक प्रयत्न १९ व्या शतकाच्या जवळजवळ मध्यावर झाला. ज्या साली भाऊ महाजनांच्या 'प्रभाकर' पत्रातून लोकहितवादींनी आपली सुप्रसिद्ध 'शतपत्रें' प्रकाशित करावयास प्रारंभ केला होता त्याच साली ह्या प्रयत्नाची मुहूर्तमेढ रोविली गेली. १३ जून १८४८[२] रोजी मुंबईतील एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमधील वरच्या वर्गातील आजी व माजी विद्यार्थ्यांनी आणि प्राध्यापकांनी एकत्र येऊन सभा घेतली व एक संस्था स्थापन केली. सभेच्या अध्यक्षस्थानी प्रो० दादाभाई नवरोजी होते. नव्याने स्थापन करण्यात आलेल्या ह्या संस्थेला "स्टूडन्टस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी" असे नाव देण्यात आले. आणि तिच्या अध्यक्षस्थानी प्रो० जोसेफ पॅटन (Patton) ए. एम्. आणि कार्यवाहपदी प्रो० रीचर्ड रीड (Reid) एलएल. डी., बार–ॲट–लॉ यांची निवड झाली. प्रो० दादाभाई नवरोजी हे सदर सोसायटीचे खजिनदार झाले. संस्थेचे प्रारंभीचे सभासद २२ होते. त्यांत १८ विद्यार्थी होते. वर उल्लेखिलेल्या पदाधिकाऱ्यांखेरीज पुढील नावे संस्थेच्या ह्या प्रारंभीच्या सभासदांच्या यादीत आढळतात. बहिरामजी कर्सेटजी, विनायक हरिश्चंद्र, प्राणलाल मथुरादास, पालनजी फ्रामजी, डोसाभाई फ्रामजी, एदलजी नसरवानजी, धोंडदेव त्र्यंबक, बोमनजी पेस्तनजी, मोहनलाल रणछोडदास, जहांगीर बर्जोरजी, जहांगीर होर्मसजी, कावसजी एडुलजी, महादेव गोविंदशास्त्री, विष्णु अमृतराम, बर्जोरजी रुस्तुमजी, अर्देशीर फ्रामजी, फ्रामजी एडुलजी, होरमसजी बहिरामजी आणि सुंदर रघुनाथ. संस्था स्थापन करण्यामागील उद्देश स्पष्ट करिताना जे शब्द वापरले आहेत ते पुढीलप्रमाणे आहेत:

---

२. स्टू० लि० ॲ० सा० सोसायटी ही संस्था ६ जून १८४८ रोजी स्थापन झाल्याचा उल्लेख श्री० पु० बा० कुलकर्णी यांच्या 'नाना शंकरशेट यांचें चरित्र' ह्या ग्रंथात आढळतो. १९ सप्टेंबर १८४९ च्या The Telegraph and Courier पत्राच्या अंकातील माहितीवरून ते ही सभा-स्थापनेची तारीख समजत असावेत असे दिसते. सोसायटीचा १९५० साली प्रसिद्ध झालेला जो शंभर वर्षांतील कार्याचा अधिकृत अहवाल आहे त्यात आणि प्रो० अ० का० प्रियोळकर यांच्या 'दादोबा पांडुरंग' ह्या ग्रंथात संस्थेची स्थापना १३ जून १८४८ रोजी झाली अशी माहिती मिळते.

" .. to foster healthy tone of mind by insisting that indolence and apathy lead only to moral suicide and by placing in a clear light the sure results of self-reliance, the steady progress to self-advancement and the golden crown of self-respect, to hold forth the torch of hope and to kindle the flame of generous enthusiasm at the altar of duty."[3] ह्या सभेची बैठक दर पंधरवड्याने व्हावी आणि सदर बैठकीत वाङ्मय, विज्ञान आणि सामाजिक सुधारणा ह्यांपैकी कोणत्याही विषयावर दोन सभासदांनी लिहिलेल्या निबंधांचे वाचन होऊन त्यांवर चर्चा व्हावी असे ठरविण्यात आले. ज्यांनी निबंध लिहून वाचावयाचे त्यांची नावे कार्यवाहांनी सभासदांच्या यादीवरून क्रमवार जाहीर करावी आणि ज्यांची नावे जाहीर होतील त्यांनी वक्तशीरपणे निबंधलेखन करावे अशी योजना झाली. निबंधलेखनाची पाळी ज्या सभासदाची त्याने निबंध न लिहिल्यास त्याला पहिल्या खेपेस १ रुपया दंड, दुसऱ्या खेपेस २ रुपये दंड आणि तिसऱ्या खेपेस त्याचे नाव सभासदपटावरून रद्द अशी शिक्षा करण्याचे निश्चित झाले.[४] (ह्या शिक्षेसंबंधीच्या कलमाची अमलबजावणी कितपत झाली हे कळावयाला मार्ग नाही. सभेच्या अहवालात तत्संबंधीचा उल्लेख आढळत नाही.) निष्क्रीय सभासदांना संस्थेत स्थान नसावे असाच ह्या सर्व योजनेमागील हेतू होता. राजकीय आणि धर्मविषयक प्रश्नांचा विचार करण्यास सभासदांना मज्जाव होता. सर्वांत महत्त्व होते ते समाज-सुधारणाविषयक प्रश्नांना.

सभेच्या स्थापनेच्या वेळीं असलेली सभासदांची संख्या एका वर्षाअखेर म्हणजे मे १८४९ पर्यंत ४६ वर गेली. ह्या पहिल्या वर्षात सभेच्या एकंदर २० बैठकी झाल्या आणि त्यांत ३५ निबंध वाचले गेले. ह्या महत्त्वपूर्ण संस्थेमार्फत सुरू झालेले हे निबंधवाचनाचे आणि चर्चेचे कार्य मधील काही

---

३. स्टु० लि० अँ० सा० सो० शतसांवत्सरिक रिपोर्ट. पान २

४. ह्या बाबतीत Student's Literary and Scientific Society चे बंगालमधील The Society for the acquisition of General Knowledge शी असलेले साम्य लक्षणीय आहे. तेथेहि जे सभासद वेळेवर निबंध वाचू शकत नसत त्यांना प्रथम दंड होई व नंतर त्यांचे सभासदत्व रद्द केले जाई.

वर्षांचा अपवाद वगळल्यास १९०६ पर्यंत अखंड चालू होते असे १९५० साली संस्थेच्या शतसांवत्सरिक उत्सवानिमित्त प्रसिद्ध झालेल्या अहवालावरून दिसते. सभेपुढे पहिला निबंध प्रा० दादाभाई नवरोजी यांनी वाचला. त्याचा विषय 'गणित विषयाच्या अभ्यासामुळें होणारे फायदे' हा होता. दुसरा निबंध बहिरामजी कर्सेटजी यांनी 'स्त्रीशिक्षण' ह्या विषयावर वाचला. सभेपुढे वाचल्या गेलेल्या निबंधांच्या संबंधात ता. ८ ऑगस्ट १९०६ रोजी एल्फिन्स्टन कॉलेजमधील इंग्रजीचे प्राध्यापक श्री. गणेश सदाशिव भाटे, एम्. ए. (एडिंबरो) यांनी "East and West" ह्या विषयावर निबंध वाचल्याची शेवटची नोंद आढळते.[५]

सभा स्थापन होऊन तीन महिने झाल्यावर म्हणजे सप्टेंबर १८४८ मध्ये सभेच्या, एक पारशी-गुजराती व एक मराठी अशा दोन शाखा स्थापन करण्यात आल्या. मराठी शाखेचे नाव 'उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभा' आणि पारशीगुजराती शाखेचे नाव 'गुजराती ज्ञानप्रसारक मंडळी' असे ठेवण्यात आले. मराठी शाखेचे अध्यक्षस्थान दादोबा पांडुरंग यांना देण्यात आले आणि पारशी-गुजराती शाखेचे अध्यक्षस्थान प्रो. दादाभाई नवरोजी यांनी विभूषित केले. मूळ सभेच्या घटनेनुसार तिच्या शाखासभांचे अध्यक्ष हे तिचे पदसिद्ध उपाध्यक्ष असत; तदनुसार मराठी व पारशी-गुजराती शाखांचे हे अध्यक्ष जनकसभेचे उपाध्यक्ष झाले. ह्या शाखा स्थापन करण्याचा उद्देश पुढील शब्दांत सांगितला गेल्याचे आढळते : "to promote the diffusion of knowledge among the uneducated masses by the reading and discussing of essays on literary, historical and social subjects, by lectures on Physical and

---

५. सभेच्या प्रतिवर्षी प्रसिद्ध झालेल्या अहवालांवरून पाहता सभेपुढे १८४८ ते १९०६ पर्यंत एकंदर १३९ निबंध वाचले गेल्याचे आढळते. सभेच्या कार्यांची १८४८ ते १९०६ पर्यंतच्या प्रत्येक वर्षीची नोंद आढळत नाही. ज्या वर्षांची नोंद आढळत नाही ती वर्षे पुढीलप्रमाणे : (१८५२ ते १८५३, १८५६-५७, १८६०-६२, १८६४-६५, १८६९-७०, १८७९-८४, १८९७-९९, १९०२-१९०५). सभेपुढे वाचल्या गेलेल्या ज्या १३९ निबंधांची नोंद आढळते त्यांतील ७३ निबंध मराठी सभासदांनी (इंग्रजीतून)वाचले असे दिसते. मराठी सभासदांच्या निबंध व व्याख्यानांची यादी : पहा परिशिष्ट.

Chemical Science, accompanied by experiments and by the publication of cheap monthly periodical literature suited to the requirements and tastes of the people."

ह्या दोन शाखा–सभांपैकी पारशी–गुजराती सभेची माहिती 'साठीना साहित्यनुं दिग्दर्शन' ह्या श्री० डाह्याभाई पीतांबरदास देरासरी यांनी गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटीच्या हीरक महोत्सवाच्या निमित्ताने १९११ साली लिहिलेल्या पुस्तकात थोड्या तपशिलाने मिळते. स्टु० लि० अँ० सा० सो०च्या ह्या पारशी–गुजराती शाखेचे सभासद पारशी, गुजराती आणि मुसलमान होते; परंतु त्यांत मुख्य भरणा पारशी सभासदांचा होता. ह्या शाखासभेने सभा स्थापन करण्याच्या वर उद्धृत केलेल्या उद्दिष्टानुसार १८४९ साली म्हणजे सभा स्थापन झाल्यावर थोडयाच दिवसांत 'गनेआन–परसारक एटले जे एलम–तथा होनरोनो–फेलावो करनार–चोपानीऊं' ह्या नावाचे एक मासिक पत्र सुरू केले. हे पत्र 'चोपानीऊं' म्हणजे चार पानी होते. ह्या मासिकपत्राचे पहिले दोन अंक निघाल्यावर त्यांतील भाषेच्या संबंधात ओरड झाली. ती ओरड सदर पत्राची भाषा शुद्ध गुजराती नसल्याबद्दलच मुख्यत्वेकरून होती. 'साठीना साहित्यनुं दिग्दर्शन'चे लेखक म्हणतात, "त्रीजा पुस्तकना प्रारंभथी आ चोपानीयुं लखनार गृहस्थोने गुजरातीनी 'शुद्ध जोडनी'नी जरूर लागी हती. ये वर्षथी चोपानीयानुं नाम सुधारीने 'ज्ञानप्रसारक' बनाव्युं हतुं" तेव्हा 'गनेआन-परसारक' हे त्याच्या तिसऱ्याच अंकापासून 'ज्ञानप्रसारक' झाले आणि त्याची भाषा 'शुद्ध जोडनी'ची गुजराती झाली असे दिसते. परंतु हे मूळचे 'गनेआन-परसारक' किती वर्षे चालले ह्या संबंधीची माहिती मिळू शकली नाही.

मूळ सभेने स्थापन केलेल्या ह्या गुजराती–पारशी शाखेच्या बैठकींमध्ये जरी समाजसुधारणांसंबंधीचा विचार भरपूर होत होता तरी प्रत्यक्षात पारशी जमातीचे प्रश्न गुजराती (हिंदू) जमातीच्या प्रश्नांहून थोडे वेगळे होते. तेव्हा गुजराती जमातीच्या प्रश्नांसंबंधी विचार करण्याकरिता जर एखादी स्वतंत्र सभा स्थापिली गेली तर तिला पुरेसे सभासद मिळून ह्या प्रश्नांसंबंधीही अधिक सुव्यवस्थितपणे विचार होईल असे वाटल्यावरून १८५१ मध्ये स्टूडन्टस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीची एक तिसरी शाखासभा स्थापन करण्यात आली आणि तिला 'गुजराती बुद्धिवर्धक सभा' किंवा 'बुद्धिवर्धक

हिंदूसभा[६]' असे नाव देण्यात आले. ह्या सभेचे पहिले अध्यक्ष रणछोडदास गिरधरभाई हे होते. रणछोडभाईनंतर प्राणलाल मथुरादास हे सभेचे अध्यक्ष झाले. नर्मदाशंकर लालशंकर, चिमणलाल नंदलाल, मोहनलाल रणछोडदास, गंगाराम किशोरदास, मथाराम शंभुनाथ, हरिवल्लभदास बाळगोविंददास, करसनदास मूळजी, जव्हेरीलाल उमियाशंकर, करसनदास माधवदास, त्रिभोवनदास द्वारकादास, महीपतराय रूपराय हे सदर सभेचे आधारस्तंभ होते. ह्या सभेने १८५६ च्या मार्चमध्ये म्हणजे सभा स्थापन झाल्यानंतर पाच वर्षांच्या कालावधीत आपले स्वतःचे मासिकपत्र सुरू केले व त्याला 'बुद्धिवर्धक ग्रंथ' असे नाव दिले. हे मासिकपत्र सुरू करण्यासंबंधीची पहिली सभा महिपतराय रूपराय यांचे घरीच भरली होती असे दिसून येते.[७]

स्टू० लि० अँ० सा० सो० ह्या संस्थेच्या शंभरीनिमित्त प्रसिद्ध झालेल्या अहवालावरून असे दिसते की, मूळ संस्थेची पारशी शाखा १८७४ पर्यंत कार्य करीत होती; परंतु त्या सभेच्या स्थापनेच्या वेळी सभासदांमध्ये दिसून आलेला उत्साह जसजशी वर्षे उलटली तसतसा मंदावत गेला. सभेपुढे निबंध वाचणारांची आणि व्याख्याने देणाऱ्यांची संख्या हळूहळू घटली. ती १८७२ पर्यंत जवळ-जवळ शून्यावर आली. १८७२ साली सदर शाखेच्या पदाधिकाऱ्यांनी एक प्रयोग करून पाहिला; सदर प्रयोग असा की, व्याख्यात्याला व्याख्यानासाठी रु० ५० मानधन द्यावयाचे आणि व्याख्यान सप्रयोग असेल तर वर रु० २५ द्यावयाचे. हा प्रयोग बराच यशस्वी झाला. १८७२–७४ ह्या दोन वर्षांच्या अवधींत त्यामुळे २१ व्याख्याने होऊ शकली. १८७४ मध्ये सभेचे सभासदत्व परत गुजराती बांधवांनाही खुले करण्यात आले; परंतु कारणे काय असतील ती असोत ह्या

---

६. 'साठीनुं साहित्यनुं दिग्दर्शन' ह्या ग्रंथात सदर सभेचे नाव 'बुद्धिवर्धक हिंदूसभा' असे दिलेले आढळते. Students' Literary & Scientific Society च्या १९५० साली प्रसिद्ध झालेल्या अहवालात तिचे नाव 'बुद्धिवर्धक सभा' असे दिलेले आढळते. दि. ब. के. एम्. जव्हेरी यांच्या Further Milestones in Gujarati Literature ह्या ग्रंथात आणि श्री. के० एम्. मुनशी यांच्या गुजराती वाङ्मयाच्या इतिहासातही 'बुद्धिवर्धक सभा' ह्याच नावाने सदर सभेचा उल्लेख येतो.

७. 'साठीना साहित्यनुं दिग्दर्शन', पान ४८।४९.

नव्या योजनेने निर्माण झालेला उत्साह पुढे टिकला नाही आणि १८७४ मध्ये ह्या सभेचे कार्य जवळजवळ संपुष्टात आले. ह्या सभेच्या अहवालांवरून असे दिसते की, सभेपुढे निबंधवाचन असे केवळ १८४९ ते १८५१ ह्या काळातच म्हणजे जोपर्यंत सभेची वेगळी गुजराती शाखा निघालेली नव्हती तोपर्यंतच झाले; त्यानंतर फारसे झाले नाही. सभेपुढे एकंदर १० निबंध वाचले गेले. त्यानंतर झाली ती फक्त व्याख्याने. व्याख्यानांची एकंदर संख्या ४० असे दिसून येते.

१८५१ साली स्थापन झालेली 'गुजराती बुद्धिवर्धक सभा' १८६३ पर्यंत समाधानकारकपणे कार्य करीत होती असे दिसते. १८६३ नंतर मात्र तिचा उत्साह मंदावल्यासारखा दिसतो. १८५४ ते १८६३ पर्यंत सदर सभेत २० व्याख्याने दिली गेली, ५२ गद्य निबंध आणि १३ पद्यात्मक निबंध[८] वाचले गेले. १८६३ ते १८९४ ह्या काळात ही सभा जेमतेम तग धरून होती. अधूनमधून सभेत निबंधवाचन आणि व्याख्याने होत होती; परंतु सभेसंबंधीच्या उत्साहाला ओहोटी लागली होती. १८९४ मध्ये सभा पुनरुज्जीवित करण्याचे प्रयत्न झाले. नवी घटना तयार करण्यात आली आणि सभासदांमध्ये कर्तव्याची जाणीव निर्माण करण्याचा प्रयत्न झाला; परंतु ह्या प्रयत्नांना यश आले नाही. सभेचे काम हळूहळू थंडावत गेले. १३ ऑक्टोबर १९३३ रोजी मुंबई हायकोर्टाच्या हुकुमानुसार ही सभा विसर्जित करण्यात आली आणि तिच्या खाती शिलकेत असलेली रु. १३,३०० ही रक्कम फॉर्बस गुजराती सभेच्या स्वाधीन करण्यात आली. फॉर्बस गुजराती सभेने व्याख्याने आणि प्रकाशने ह्यांच्यामार्फत बहुजन-समाजात ज्ञानप्रसार करण्याचे 'बुद्धिवर्धक सभे'चे कार्य पुढे चालू ठेवावे अशी अट ही रक्कम स्वाधीन करिताना घालण्यात आली. बुद्धिवर्धक गुजराती सभेने सुरू केलेले 'बुद्धिवर्धक' हे मासिक किती वर्षे चालले हे कळावयास मार्ग नाही. स्टू० लि० अँ० सा० सोसायटीच्या शतसांवत्सरिक अहवालात

---

८. ह्या पद्यात्मक निबंधांचे विषय पुढीलप्रमाणे होते : Filial Affection, Rashnness, Freedom, Evil Effects of Intoxication, Forbearance, Custom of Women of Beating the Breast on on occasions of Death, The former Superiority of the Hindus, their present Degradation and Suggestions for Ameliorating their Condition, On Duties of Man, On Medicine, On Reforms, Scenes in Gujrat, Qualities of a Hero.

सदर मासिकाचे पन्नासावर अंक निघाले एवढाच काय तो उल्लेख आढळतो.

स्टूडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीची मराठी शाखा आणि तिचे मासिक मुखपत्र 'मराठी ज्ञानप्रसारक' ह्यांनी केलेल्या कार्यासंबंधीची सविस्तर हकीकत स्वतंत्र प्रकरणात दिलेली आहे. येथे तत्संबंधीचा थोडा अधिक तपशील फक्त नमूद करावयाचा आहे. १८४८ साली 'उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभा' ह्या नावाने स्थापन झालेल्या ह्या मराठी शाखासभेने १८६४ पर्यंत अत्यंत उत्साहाने कार्य केले असे आढळते. ह्या काळातील सदर सभेचे वार्षिक अहवाल वाचताना सभेच्या पदाधिकाऱ्यांनी सभेच्या कार्याविषयी सभासदांचा उत्साह मंदावत असल्याबद्दल अनेकदा तक्रारीचे सूर काढलेले दिसतात; नाही असे नाही; परंतु असे असले तरी १८६४ पर्यंत ह्या सभेचे, व्याख्याने व निबंधवाचन ह्या संबंधातील कार्य चांगले चाललेले दिसते. सभेचे मासिक मुखपत्र 'मराठी ज्ञानप्रसारक' हे जवळजवळ १८६७ पर्यंत प्रकाशित होत राहिले. ह्याचाच अर्थ असा की, त्या भारदस्त पत्राला मजकूर पुरवण्याइतपत निबंधवाचन सभेच्या बैठकांमधून १८६७ पर्यंत होत होते. ह्यानंतरच्या काळात मात्र सभेचे कार्य मंदावत गेले; सभासदांमधील तत्संबंधीचा उत्साह कमी होत गेला; व १८९४ साली ही सभा विसर्जित करण्यात आली. ही सभा विसर्जित झाली तेव्हा तिच्या खाती २१२४ रुपये जमा होते. सभा विसर्जित करताना ही रक्कम 'दी स्टू. सा. अँ. लि. सोसायटी' ह्या जनकसभेच्या स्वाधीन करण्यात आली. 'उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभे'पुढे जी व्याख्याने देण्यात आली आणि निबंध वाचण्यात आले त्यांची नोंद १८७३ पर्यंत आढळते.[१] त्यानंतरची नोंद सापडत नाही. उपलब्ध नोंदीवरून पाहता १८४९ ते १८७३ पर्यंत सभेपुढे कमीत कमी ५९ निबंध वाचले गेले असावेत आणि ३३ व्याख्याने दिली गेली असावीत. ह्या कालखंडातील काही वर्षांची नोंद सापडत नाही; परंतु नोंद सापडत नाही याचा अर्थ त्या वर्षांमध्ये एकही निबंध वाचला गेला नाही व व्याख्यान झाले नाही असा होत नाही. १८७३ पर्यंत जवळजवळ अव्याहत चाललेले सभेचे व्याख्याने व निबंधवाचन ह्या संबंधातील कार्य कोणत्या तोलाचे होते ह्याचा अंदाज ज्याप्रमाणे 'मराठी ज्ञानप्रसारका'चे अंक चाळताना येतो त्याचप्रमाणे सभेच्या ह्या कार्याशी जी नावे संबद्ध असल्याचे आढळते त्या नावांवरून नजर टाकल्यासही

---

१. परिशिष्ट पहा.

उत्तम प्रकारे येतो. ज्या व्यक्तींची नावे सभेच्या ह्या कार्याशी सलग्न असल्याचे दिसते त्यात त्या काळातील पुढील नामवंत व्यक्ती आढळतात : विश्वनाथ नारायण मंडलिक, भास्कर दामोदर पाळंदे, गोविंद नारायण, डॉ. आत्माराम पांडुरंग, महादेव गोविंद रानडे, रामकृष्ण गोपाळ भांडारकर, वामन आबाजी मोडक, बाळ मंगेश वागळे, रा. सा. महादेव गोविंदशास्त्री, डॉ. सखाराम अर्जुन, डॉ. पांडुरंग गोपाळ, विष्णुशास्त्री पंडित, जनार्दन सखाराम गाडगीळ, नारायण दीनानाथजी वेलकर, नारायण परमानंद इ०.

स्टूडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीच्या पारशी-गुजराती व मराठी शाखांनी निबंधवाचन, व्याख्याने, चर्चा आणि नियमित प्रकाशने ह्यांच्यामार्फत एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर केलेल्या कार्याचे स्वरूप आतापर्यंत थोडक्यात वर्णिले; परंतु ह्या महनीय कार्याइतकेच मोलाचे जे स्त्री-शिक्षणविषयक कार्य ह्या संस्थेकडून १८४८–४९ च्या सुमारास सुरू झाले त्याचा येथे निर्देश करणे अगत्याचे आहे. पुण्यास महात्मा जोतिबा फुले यांनी मुलींसाठी १८४८ त शाळा काढली. स्टूडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीच्या सभासदांनी स्त्रीशिक्षणाच्या संबंधात केलेल्या प्रयत्नांना १८४९ मध्ये प्रारंभ झाला. सोसायटीच्या पाक्षिक सभेपुढे ऑगस्ट १८४९ मध्ये दोन निबंध वाचले गेले. त्यांतील एक दादाभाई नवरोजी यांनी वाचला होता आणि त्याचा विषय होता 'The Duties of a Teacher' (शिक्षकाचीं कर्तव्यें); आणि दुसरा निबंध ४ ऑगस्ट १८४९ रोजी वाचला होता बहिरामजी कर्सेटजी ह्या गृहस्थांनी व त्याचा विषय होता 'Female Education' ('स्त्रीशिक्षण'). ह्या दोन निबंधांच्या – विशेषतः दुसऱ्या निबंधाच्या वाचनानंतर जी चर्चा झाली तिचा परिणाम सोसायटीच्या सभासदांमध्ये – वरच प्रारंभी स्पष्ट केल्याप्रमाणे हे सभासद बव्हंशी शिक्षक आणि एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटच्या विश्वविद्यालयीन शाखेतील विद्यार्थीच होते – स्त्रीशिक्षणाच्या संबंधात आपल्यावर पडत असलेल्या जबाबदारीची यथोचित जाणीव निर्माण करण्यात झाला. ही जाणीव होऊन तेथेच थांबली नाही; तर त्याच सभेत स्त्रियांसाठी शाळा सुरू करण्यासंबंधीचा ठरावही पास झाला व सभासद प्रत्यक्ष उद्योगाला लागले. मुंबईतील लोहार चाळ, पालव रोड आणि गिरगाव ह्या ठिकाणी शाळांसाठी विनामूल्य जागा मिळविण्यात आल्या. गिरगावात नाना शंकरशेट यांनी आपल्या राहत्या वाड्याजवळील इमारत शाळेसाठी दिली आणि अशाच इमारती व जागा

इतरांकडूनही सोसायटीच्या स्वाधीन करण्यात आल्या. कामा कुटुंबातील चार पारशी सद्‌गृहस्थांनी संस्थेच्या शाळांचा दोन वर्षांचा संपूर्ण खर्च भागेल एवढी रक्कम अध्यक्षांच्या स्वाधीन केली. एवढे होताच सोसायटीने मुंबईमध्ये मराठी मुलींसाठी तीन आणि पारशी-गुजराती मुलींसाठी चार अशा एकंदर सात शाळा स्थापन केल्या. ह्या शाळांतून शिकविण्यासाठी सोसायटीचे विद्यार्थी-सभासद आणि शिक्षक-सभासद यांनी स्वयंस्फूर्तीने मान्यता दिली आणि विनावेतन काम करण्याचे पतकरले. ह्या स्वयंसेवकांच्या स्वतःच्या नेहमीच्या दैनंदिन अध्ययन-अध्यापनाच्या कामात अडथळा येऊ नये यासाठी शाळांचे वर्ग रोज सकाळी ७ ते १० घेण्याचे ठरले व त्याप्रमाणे २१ ऑक्टोबर १८४९ रोजी कामास प्रारंभ झाला. प्रारंभी शाळांतून विद्यार्थिनींची फारच उणीव भासू लागली. तेव्हा घरोघरी जाऊन, लोकांची समजूत पटवून शाळेत विद्यार्थिनींचा भरणा करण्याचे कामही ह्या स्वयंसेवक विद्यार्थ्यांनीच आपल्या शिरावर घेतले. त्यांतील अनेकांनी आपल्या धाकट्या बहिणींची नावेच प्रथम ह्या शाळांतून नोंदविली. हळूहळू पहिल्याच वर्षी मराठी मुलींची संख्या २४ वर गेली आणि पारशी-गुजराती मुलींची संख्या ४४ झाली. ही संख्या प्रतिवर्षी वाढत गेली आणि थोड्याच वर्षांत सदर शाळांवर पगारी शिक्षकांची नेमणूक करण्यात आली. अशा प्रकारे पगारी शिक्षक नेमले जाताच प्रारंभीच्या स्वयंस्फूर्तीने अध्यापनाचे काम करणाऱ्या विद्यार्थी-शिक्षकांनी आणि प्राध्यापकांनी स्वतःकडे पर्यवेक्षणाचे काम घेतले. अगदी प्रारंभी ज्या स्वयंसेवकांनी ह्या मुलींच्या मराठी शाळांतून विनावेतन अध्यापनाचे काम केले त्यांची नावे पुढीलप्रमाणे होत :

| *शाळा* | *शिक्षकाचे नाव* | *व्यवसाय* |
|---|---|---|
| १. लोहार चाळ | भास्कर दामोदर पाळंदे | एल्फिन्स्टन विद्यालयात तृतीय वर्षाचे विद्यार्थी |
| | सखाराम दीक्षित | मराठी शिक्षक |
| २. पालव रोड | धोंडदेव त्र्यंबक | एल्फिन्स्टन विद्यालयात द्वितीय वर्षाचे विद्यार्थी |
| ३. शंकरशेट वाडा | नारायण विष्णू शामराव तात्या | एल्फिन्स्टन विद्यालयात तृतीय वर्षाचे विद्यार्थी |
| | महादेव गोविंदशास्त्री | संस्कृत शिक्षक |

प्रारंभीच्या पारशी-गुजराती शाळांतून ज्यांनी स्वयंस्फूर्तीने विनावेतन अध्यापनाचे काम केले त्यांची नावे : बहिरामजी कर्सेटजी (तृतीय वर्ष : विद्यार्थी), जहांगीर होरमसजी (तृतीय वर्ष : विद्यार्थी), अर्देशिर फ्रामजी (दुय्यम शिक्षक), पालनजी फ्रामजी (तृतीय वर्ष : विद्यार्थी), जहांगीर बर्जोरजी (चतुर्थ वर्ष : विद्यार्थी), आणि एदलजी नसरवानजी (तृतीय वर्ष : विद्यार्थी). मुंबईतील बहारकोटे (Baharkote) विभागातील शाळेची प्रो. दादाभाई नवरोजी स्वतः व्यवस्था पाहात होते.

सोसायटीने अंगीकारलेल्या ह्या स्त्री-शिक्षणविषयक कार्याला पुढे कसे रंगरूप आले ते मुंबईत स्त्री-शिक्षणाच्या संबंधात गेल्या शतकात झालेली प्रगती लक्षात घेता सहज स्पष्ट होते. सोसायटीने ह्या क्षेत्रात केलेल्या कार्याला योग्य दिशा मिळावी एवढ्यासाठी मुंबईचे गव्हर्नर सर अर्स्काइन पेरी यांनी १८५२ च्या ऑक्टोबरमध्ये युरोपीय स्त्रियांची एक समिती नेमून त्या समितीच्या सूचनांनुसार सदर शाळांत सुधारणा घडवून आणाव्यात ह्या कल्पनेने एक योजना आखली होती; परंतु पेरी साहेबांच्या ह्या योजनेला फार जोराचा विरोध झाला. अगोदरच तत्कालीन मराठी, गुजराती व पारशी समाज स्त्री–शिक्षणाच्या कल्पनेस फारसा अनुकूल नव्हता. त्यात ह्या शिक्षणात सुधारणा करण्यासाठी युरोपीय महिलांची समिती नेमल्यास व त्या समितीने केलेल्या सूचनांची अंमलबजावणी झाल्यास आपली संस्कृतीच रसातळाला जाईल अशी भीती ह्या समाजाच्या मनांत निर्माण करण्याचे प्रयत्न झाले. त्यात 'चाबूक' ह्या गुजराती वर्तमानपत्राने पुढाकार घेतला व ह्या समितीच्या सूचना लक्षात घेतल्या गेल्यास संस्कृतीबरोबरच आपली कुटुंबसंस्थाही ढासळेल अशी धोक्याची सूचना त्याने हिंदू व पारशी समाजांस दिली. ह्या टीकेचे उग्र स्वरूप पाहताच पेरीसाहेबांनी आपली सुधारणा समिती नेमण्याची कल्पना बाजूला सारली.

हे सर्व झाले तरी सोसायटीने प्रारंभिलेले कार्य जोरात चालू राहिले. मुंबईमध्ये कमळाबाईची शाळा ह्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या व ह्याच संस्थेने स्थापन केलेल्या शाळेला आता ११५ वर्षे झाली आहेत. १९५० सालीच ह्या शाळेने आपली शंभरी साजरी केली.

प्रकरण दुसरे

# ‘उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभा’ आणि ‘मराठी ज्ञानप्रसारक’

ह्या प्रकरणात स्टू. लि. अँ. सा. सो. ह्या सभेच्या ‘उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभा’ ह्या मराठी शाखासभेने केलेल्या कार्याची माहिती सदर शाखासभेचे मुखपत्र ‘मराठी ज्ञानप्रसारक’ मासिक ह्याच्या आधारे दिली आहे.

‘मराठी ज्ञानप्रसारक’ ह्या मासिकाचा पहिला अंक एप्रिल १८५० मध्ये प्रसिद्ध झालेला आढळतो. मला उपलब्ध झालेला ह्या मासिकाचा शेवटला अंक नोव्हेंबर १८६६ मधील आहे; परंतु तो सदर मासिकाचा शेवटला अंक नसावा. हे मासिक जुलै १८६७ पर्यंत तरी निश्चित हयात असावे; कारण जुलै १८६७ मध्ये ‘विविधज्ञानविस्तार’ मासिकाचा जो पहिला अंक प्रसिद्ध झाला आहे त्याच्या उपोद्घातात आपणांस विचारण्यात येणाऱ्या एका प्रश्नाचे उत्तर ‘विस्तारा’च्या संपादकांनी दिलेले आढळते. ‘विस्तारा’च्या संपादकांना विचारण्यात आलेला प्रश्न असा होता की, ‘ज्ञानप्रसारक’ चालू असता ‘विविधज्ञानविस्तार’ हे मासिक काढण्याची आवश्यकताच काय होती; ह्या प्रश्नास उत्तर देताना संपादकांनी पुढील उद्गार काढलेले आहेत. ते म्हणतात, “‘ज्ञानप्रसारका’स आमच्या विद्वानांनीं साहाय्य करावें हें तर ठीकच; परंतु दुसरीं आणखीं पुस्तकें निघूं नयेत असें नाहीं.” ‘विस्तारा’च्या संपादकांनी काढलेल्या ह्या उद्गारांवरून जुलै १८६७ मध्ये ‘मराठी ज्ञानप्रसारक’ चालू होते असे निश्चित दिसते; परंतु खटपट करूनही नोव्हेंबर १८६६ नंतर

निघालेल्या त्याच्या अंकांची माहिती उपलब्ध होऊ शकली नाही. ते बहुधा १८६७ सालअखेरपावेतो कसेतरी चालून बंद पडले असावे असे वाटते.

एप्रिल १८५० पासून नोव्हेंबर १८६६ पर्यंत ह्या मासिकाचे जे अंक निघाले त्यांपैकी मार्च १८५३, जुलै १८५५, ऑक्टोबर १८५५ हे अंक मला उपलब्ध होऊ शकले नाहीत. त्याचप्रमाणे ह्या मासिकाचे सप्टेंबर १८५८ पासून मार्च १८५९ पर्यंत म्हणजे एकंदर सात महिन्यांचे अंक उपलब्ध झाले नाहीत; एप्रिल १८५९ चा अंक दहाव्या पुस्तकाचा पहिला अंक म्हणून प्रसिद्ध झाला आहे. ऑगस्ट १८५८ चा अंक हा नवव्या पुस्तकाचा पाचवा अंक आहे. ऑगस्ट १८५८ ते एप्रिल १८५९ ह्या दरम्यानचे सात महिन्यांचे अंक प्रसिद्धच झाले नसावेत असे मानायला जागा आहे. एप्रिल १८५९ च्या अंकात, 'ज्ञानप्रसारका'च्या संपादकांनी असे म्हटलेले आढळते की, "आमच्या पुस्तकाचे जे अंक मागें पडले आहेत ते सध्या तसेच ठेवून, ह्या महिन्यास दहावें पुस्तक चालू केलें आहे; व पुढें महिन्याच्या महिन्यास त्याचे अंक काढावे असा बेत आहे. नवव्या पुस्तकाचे जे अंक टाकले आहेत ते फुरसत सांपडेल त्याप्रमाणें आम्ही काढीत जाऊं." हे जे आश्वासन संपादकांनी ग्राहकांना दिलेले आढळते ते त्यांच्याकडून बहुधा पुढे कधीच पुरे झालेले नसावे असे वाटते. त्याला एक महत्त्वाचा पुरावा असा की, जुलै व ऑगस्ट १८५८ च्या म्हणजे नवव्या वर्षाच्या चौथ्या व पाचव्या अंकांतून 'रात्रिभ्रम' ह्या नावाचे एक नाटक प्रसिद्ध झाले आहे. ते ह्या दोन्ही अंकांतून पुरे झालेले नाही. एप्रिल १८५९ च्या अंकात ह्या नाटकाचा पुढील भाग प्रसिद्ध करिताना संपादकांनी 'मागील पुस्तकाच्या ५ व्या अंकावरून (म्हणजे ऑगस्ट १८५८ च्या अंकावरून) चालू' अशी टीप जोडलेली आहे. ह्या टीपेवरून नवव्या पुस्तकाच्या पाचव्या अंकापुढील सात महिन्यांचे अंक प्रसिद्ध झाले नसावेत ह्या आपल्या तर्कास पुष्टी मिळते.

१८५० ते १८६७ ह्या अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासातील एका अत्यंत महत्त्वाच्या कालखंडात ह्या मासिकाने केलेले कार्य फार लक्षात घेण्याजोगे आहे. 'विविधज्ञानविस्तार' (१८६७) आणि 'निबंधमाला' (१८७४) ह्या नियतकालिकांच्या उदयापूर्वीचा हा कालखंड आहे. १८५७ साली मुंबई विद्यापीठाची स्थापना झाली परंतु 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या कार्यास १८५७च्या अगोदरच ७ वर्षे प्रारंभ झालेला आहे. इंग्रजी विद्येचे महाराष्ट्रात आगमन

होऊन ३०।३५ वर्षे उलटतात न उलटतात तोच ह्या महत्त्वपूर्ण मासिकाचा उदय झालेला आहे. बाळशास्त्री जांभेकरांचे 'दर्पण' १८३२ मधील. हे मराठीतील पहिले नियतकालिक. ह्या नियतकालिकाचा जन्म होऊन एक दीड तप उलटले नाही तोच 'मराठी ज्ञानप्रसारका'चा जन्म झाला. 'ज्ञानप्रसारका'च्या पूर्वी व त्याच्या काळात निघालेल्या इतर नियतकालिकांपेक्षा 'ज्ञानप्रसारका'ने केलेले कार्य वेगळ्या प्रकारचे आहे. ह्या काळातील सर्वच नियतकालिके नवीन विद्येचा प्रसार करण्यासाठी, लोकांना शहाणे करण्यासाठी मूलतः निघालेली आहेत. ह्या नियतकालिकांच्या नावांमध्ये 'ज्ञान' आणि 'प्रकाश' ह्या अर्थांच्या शब्दांना सतत महत्त्वाचे स्थान प्राप्त झालेले आहे. 'ज्ञानप्रकाश', 'ज्ञानोदय', 'ज्ञानचंद्रोदय', 'ज्ञानदर्शन', 'धूमकेतू', 'इंदुप्रकाश', 'प्रभाकर' ही नावे काय सुचवितात? परंतु ह्या सर्व नियतकालिकांमध्ये 'मराठी ज्ञानप्रसारका'चे स्थान अनन्यसाधारण आहे. त्याचे उद्दिष्ट उघडउघडपणे ज्ञानप्रसार हेच असले तरी ते मुख्यतः विद्येला वाहिलेले मासिक आहे. त्याचा उद्देश केवळ अज्ञ वाचकांना शहाणे करण्याचा नसून सुशिक्षितांमध्ये विविध अभ्यासविषयांच्या व्यासंगाची गोडी निर्माण व्हावी हा आहे. आपल्या आवडीच्या विषयांवर अभ्यासपूर्ण निबंधलेखन करण्याची प्रवृत्ती प्रौढ विद्यार्थ्यांमध्ये आणि नवशिक्षितांमध्ये रूढ व्हावी, विद्यापीठीय अभ्यासक्रम पूर्ण झाल्यानंतरही त्यांचे ठिकाणी आपल्या निवडीच्या अभ्यासविषयाचा व्यासंग चालू ठेवण्याची इच्छा बळावत जावी ह्या उद्देशाने सदर मासिकाचा जन्म झालेला दिसतो. हे मासिक म्हणजे केवळ एकट्यादुकट्या व्यक्तीच्या डोक्यातून निघालेली कल्पना नसून अभ्यासाबद्दल आस्था असलेल्या व त्या दृष्टीने अगदी स्वेच्छेने एकत्र जमलेल्या अनेक विद्याप्रेमी मंडळींनी मोठ्या जिद्दीने व नेटाने जवळजवळ १७ वर्षे चालू ठेवलेली वाङ्मयीन कामगिरी होय. ह्या मासिकाच्या मागे एक विद्याप्रेमी सभा होती व त्या सभेच्या ज्ञानप्रसारार्थ चालू झालेल्या महत्त्वपूर्ण कार्याचा ते मासिक हा एक भाग होता ही गोष्ट मुद्दाम लक्षात बाळगण्याजोगी आहे. एवढे खरे की, ह्या मासिकाने १८५० ते १८६७ ह्या सतरा वर्षांत केलेले जे कार्य आज आपल्या डोळ्यांपुढे आहे त्याने वर उल्लेखिलेले त्याचे महत्त्वाचे उद्दिष्ट मोठ्या प्रमाणांत साधल्याचे आढळून येते. १८६७ साली निघालेल्या 'विविधज्ञानविस्ताराने' एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि विसाव्या शतकाच्या पहिल्या दोन

दशकांत पुढे जी महत्त्वाची वाङ्मयीन कामगिरी बजावली तिची सर्व पूर्वतयारी १८६७ पूर्वीच 'मराठी ज्ञानप्रसारका'ने केली होती असे स्पष्ट दिसते. किंबहुना ज्या विज्ञानाच्या क्षेत्राकडे 'विस्तारा'ने कधीच फारसे लक्ष दिलेले दिसत नाही, त्याही क्षेत्रातील अनेक महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधीचे अत्यंत व्यासंगपूर्ण लेखनही 'मराठी ज्ञानप्रसारका'ने सतत प्रसिद्ध केलेले आढळते. किंबहुना पुढे अनेक वर्षांनी निघालेल्या (व आजही प्रकाशित होत असलेल्या) 'सृष्टिज्ञान' मासिकातील लेखनाची आठवण करून देणारे लेखन 'ज्ञानप्रसारका'ने सतत १७ वर्षे प्रकाशित केलेले आढळते. ह्या दृष्टीने 'मराठी ज्ञानप्रसारक' हा महाराष्ट्रात विद्यापीठाची स्थापना होण्यापूर्वीच मराठीत 'विद्यापीठ पत्रिका' (University Journal) काढण्याचा झालेला पहिला अनधिकृत प्रयत्न आहे असेच म्हणावेसे वाटते.

"मराठी ज्ञानप्रसारका'ची जन्मकहाणी लक्षात घेतल्यास मी त्याला मराठींत निघालेली पहिली अनधिकृत 'विद्यापीठ पत्रिका' का म्हणतो ते विशेष लक्षात येईल. ही जन्मकहाणी ज्याप्रमाणे 'ज्ञानप्रसारका'च्या पहिल्या अंकात (एप्रिल १८५०) आलेली आहे त्याचप्रमाणे थोड्याअधिक तपशिलाने ती 'ज्ञानप्रसारका'-च्या १४ व्या 'पुस्तका'च्या दुसऱ्या अंकातही (फेब्रुवारी १८६३) आलेली आहे. 'ज्ञानप्रसारका'च्या पहिल्या अंकात (एप्रिल १८५०) जी हकीकत आली आहे तिजवरून असे दिसते की, "मुंबईत एल्फिन्स्टन विद्यालयांत 'उपयुक्त ज्ञानप्रसारक' या नांवाची सभा १८४८ तील 'सप्तंबर' महिन्याच्या १ तारखेस स्थापित झाली,' म्हणजे The Students' Literary & Scientific Society ह्या जनकसभेच्या स्थापनेनंतर बरोबर तीन महिन्यांनीं स्थापन झाली. ह्या सभेपुढे दिलेल्या पहिल्या व्याख्यानात सभेचे अध्यक्ष दादोबा पांडुरंगजी यांनी सभेच्या स्थापनेची पुढील माहिती दिलेली आढळते. "एके दिवशीं या विद्यालयांतील विद्यार्थी नानाप्रकारच्या विषयांवर संभाषण करीत असतां त्यांचें मनांत असें आलें कीं, आपण ह्या विद्यालयांत जी विद्या संपादितों तिचा स्वदेशीय लोकांमध्यें प्रसार करावा. कारण स्वदेशीय लोकांतून बहुतेक लोकांस गृहकृत्यामुळें अशा विद्यालयांत येऊन अन्यभाषेचा पुर्तेपणीं अभ्यास करून त्यांतील सुरस विषयांची रुची घेण्यास अवकाश मिळत नाहीं; याकरितां एका मंडळीची स्थापना करून तींत अन्यभाषेंतील उपयुक्त विषयांचें, व्याख्यानें आणि निबंध यांच्या द्वारें महाराष्ट्रभाषेंत विवेचन केलें असतां बहुतेकांस त्या

सुंदर आणि उपयुक्त विषयांचें अल्पायासानें ज्ञान प्राप्त होईल असें ठरवून एक सभा स्थापित केली; आणि महिन्यांतून दोन वेळ ती सभा भरवावी असें करून एके दिवशीं व्याख्यान करावें व एके दिवशीं निबंध वाचावें असे ठरविलें... उपयुक्त म्हणजे व्यवहारादिकांत उपयोगी पडणारें, ज्ञान म्हणजे जाणणें आणि प्रसारक म्हणजे फैलाव करणारी, तर ह्या सृष्टींत विद्या, कला, कौशल्यें, आणि दुसऱ्या कांहीं जाणण्यासारख्या गोष्टी यांचा फैलाव करणें हाच ह्या सभेच्या मुख्य उद्देश होय." 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या मुळाशी असलेली विद्याप्रेमी लोकांची सभा ती ही होय.

ह्या सभेच्या स्थापनेसंबंधीच्या वरील हकीकतीशी फेब्रुवारी १८६३ च्या 'ज्ञानप्रसारका'त आलेली हकीकत ताडून पाहण्याजोगी आहे; ही हकीकत सभेच्या १५ व्या वाढदिवशी रा० सा० विश्वनाथ नारायण मंडलीक यांनी सभेपुढे वाचून दाखविली असे दिसते. ह्या हकीकतीच्या आरंभी 'मराठी ज्ञानप्रसारक सभेच्या स्थापनेच्या इतिहासाविषयीं मी कोठें अद्यापि लेख लिहिला नाहीं' असे त्यांनी म्हटले आहे: ते म्हणतात, "१८४८ सांत सेप्टेंबर महिन्यांत...एके दिवशीं सायंकाळीं विद्यार्थ्यांस रजा जाहल्यावर एल्फिन्स्टन विद्यालयाचा (च्या) 'कॉलेज' संज्ञक भागांत पुष्कळ विद्यार्थी आणि कांहीं गुरु व उपगुरु वगैरे मंडळी जमा झाली. त्यावेळीं पुष्कळ वादविवाद होऊन ही सभा स्थापावी असें ठरलें. नंतर कांहीं दिवसांनीं पहिलें अध्यक्ष रा. दादोबा पांडुरंग यांनीं उपोद्घातरूप व्याख्यान केलें. त्यावेळची विद्यार्थ्यांची हौस, लोकांची गर्दी व दर्शनी आस्था हीं पाहून कोणास उत्तेजन न येते? असो. पुढें सभेचे नियम होऊन व्याख्यानांचा व निबंधांचा क्रम चालला...सभा चालू झाल्यानंतर १७ महिन्यांनीं (जानेवारी १८५०)[1] 'मराठी ज्ञानप्रसारक' हा ग्रंथ निघूं लागला."

---

१. "'मराठी ज्ञानप्रसारक' मासिकाच्या पहिल्या अंकावर एप्रिल १८५० असा त्याचा प्रकाशनाचा महिना नोंदलेला आहे. तेव्हा 'मराठी ज्ञानप्रसारका'चा पहिला अंक मंडलीक म्हणतात त्याप्रमाणे जानेवारी १८५० मध्ये निघालेला दिसत नाही. मंडलिकांनी हे विधान नजरचुकीने किंवा विस्मरणाने केले असावे. मराठी ज्ञानप्रसारकाचा वर्षारंभ १८५० ते १८६२ पर्यंत एप्रिलमध्ये होत असे असे दिसते. १८६२ नंतर तो जानेवारीत होऊ लागला. मंडलिकांचे

ह्या 'उपयुक्त ज्ञानप्रसारक' सभेचे पहिले व्यवस्थापक मंडळ व पदाधिकारी पुढीलप्रमाणे होते : अध्यक्ष : दादोबा पांडुरंगजी; उपाध्यक्ष आणि चिटणीस : महादेव गोविंदशास्त्री; खजिनदार : विनायक हरिश्चंद्रजी, व्यवस्थापक मंडळ : दादोबा पांडुरंगजी, महादेव गोविंदशास्त्री, विनायक हरिश्चंद्रजी, नारायण दीनानाथजी, लक्ष्मण नृसिंह जोशी, भिकाजी भास्कर, नारायण विष्णु, दाजी परशुराम. हे व्यवस्थापक मंडळ स्थापन झाल्यानंतर लवकरच दादोबा पांडुरंगांनी 'स्थलांतर केल्यामुळें' त्यांचे जागी अध्यक्ष म्हणून नारायण दीनानाथजी यांची निवड झाली आणि सभेचे चिटणीस म्हणून महादेव गोविंदशास्त्री यांचे जागी सखाराम दीक्षित यांना नियुक्त करण्यात आले. 'ही सभा महिन्यांतून दोहीं गुरुवारीं पंधरा दिवसांच्या अंतरानें भरत' असे. सभा स्थापन झाली तेव्हा अपेक्षा अशी होती की, "एका गुरुवारीं कोणी एक सभासद शास्त्रीय विषयांचें व्याख्यान करीत जाईल व दुसऱ्या गुरुवारीं दोघे सभासद निबंध वाचतील व त्या निबंधाच्या विषयावर वादविवाद होत जातील." सभेची वर्गणी दरमहा फक्त दोन आणे होती. निबंध आणि व्याख्यान यांच्याबाबत एकच नियम होता. तो असा की, "धर्मसंबंधीं व सांप्रतच्या राज्यप्रकरणसंबंधीं सर्वथा निबंध लिहिले जाणार नाहीत व त्या विषयांवर नुसता संवाद देखील होणार नाहीं." प्रत्येक निबंधलेखकास निबंधलेखनासंबंधीची सूचना कमीत कमी दीड महिना आगाऊ दिली जात असे.

निबंधलेखकाने आपला निबंध निबंधवाचनाच्या तारखेपूर्वीं १५ दिवस सभेकडे सादर करावा असा नियम होता. मुंबईबाहेरील व्यक्तींना देखील उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेचे सभासदत्व स्वीकारता येत होते. ह्या सभासदांना 'पत्रद्वारें व्यवहार ठेवणारे सभासद' ह्या नावाने ओळखीत असत. सभेचे अध्यक्ष व उपाध्यक्ष यांना निबंध न वाचण्याची सवलत ठेवण्यात आली होती. सभेपुढे वाचल्या गेलेल्या ह्या निबंधांमधूनच मुख्यत्वेकरून 'ज्ञानप्रसारका'त येणाऱ्या मजकुराची निवड केली जात होती. मुख्यत्वेकरून असे म्हणण्याचे कारण एवढेच की, 'ज्ञानप्रसारका'त प्रसिद्ध झालेल्या लेखनात सभेपुढे

---

हे भाषण सभेच्या १५ व्या वाढदिवशी म्हणजे १८६५ मधील असल्यामुळे १८६२ पर्यंत ह्या मासिकाचा वर्षारंभ एप्रिलमध्येच होत होता ही गोष्ट त्यांच्या स्मरणातून गेली असावी.

वाचल्या न गेलेल्या म्हणजे बाहेरून आलेल्या लेखनाचाही भाग बराच आढळतो. ते लेखन परस्परे 'ज्ञानप्रसारका'च्या संपादकांकडे लेखकांकडून पाठविण्यात येत असावे व त्यांतून जे संपादकांच्या पसंतीस उतरले जाई त्याचा स्वीकार होत असावा.

'मराठी ज्ञानप्रसारका'ने केलेल्या कार्याचे स्वरूप तपशीलवारपणे समजून घेण्यापूर्वी ह्या महत्त्वपूर्ण मासिकाला जन्म देणाऱ्या व त्याचे सतत १६।१७ वर्षे जतन करणाऱ्या 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभे'संबंधीची १८५० ते १८६६ ह्या काळातील जी माहिती आपणांस 'ज्ञानप्रसारका'च्या अंकांतूनच मिळते ती प्रथम लक्षात घेतलेली बरी :

१८५० ते १८६६ पर्यंतच्या 'मराठी ज्ञानप्रसारकाच्या' अंकांतून 'उपयुक्त ज्ञानप्रसारक' सभेच्या कामकाजाची इतिवृत्ते अधूनमधून प्रसिद्ध झालेली आढळतात व त्यावरून ह्या उपयुक्त सभेचे कामकाज कसे चालत होते याचा आपणांस बराच अंदाज येतो. अशा प्रकारची इतिवृत्ते आपणांस 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या पुढील अंकांतून आढळतात:

| *पुस्तक* | *अंक* | *महिना* | *वर्ष* |
|---|---|---|---|
| १ | १ | एप्रिल | १८५० |
| ६ | ११ | फेब्रुवारी | १८५६ |
| ६ | १२ | मार्च | १८५६ |
| ७ | ७ | ऑक्टोबर | १८५६ |
| ७ | १० | जानेवारी | १८५७ |
| ७ | ११ | फेब्रुवारी | १८५७ |
| ८ | १ | एप्रिल | १८५७ |
| ८ | ४ | जुलै | १८५७ |
| ८ | १० | जानेवारी | १८५८ |
| १० | १ | एप्रिल | १८५९ |
| १० | ६ | सप्टेंबर | १८५९ |
| ११ | २ | मे | १८६० |
| ११ | ७ | ऑक्टोबर | १८६० |
| ११ | ११ | फेब्रुवारी | १८६१ |

| पुस्तक | अंक | महिना | वर्ष |
|---|---|---|---|
| १२ | ११ | फेब्रुवारी | १८६२ |
| १३ | ९ | डिसेंबर | १८६२ |
| १४ | २ | फेब्रुवारी | १८६३ |
| १४ | ६ | जून | १८६३ |
| १४ | ११ | नोव्हेंबर | १८६३ |
| १४ | १२ | डिसेंबर | १८६३ |
| १५ | ३ | मार्च | १८६४ * |

उपर्युक्त ज्ञानप्रसारक सभा स्थापन झाल्यानंतर १७ महिन्यांनी 'मराठी ज्ञानप्रसारका'चा जन्म झालेला असल्यामुळे 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या पहिल्या अंकात सप्टेंबर १८४८ पासून एप्रिल १८४९ पर्यंत सभेने घेतलेल्या कार्यक्रमाची नोंद आहे. त्या नोंदीवरून पाहता ह्या काळात सभेच्या एकंदर १६ बैठकी झाल्या व त्यांत एकुण १२ निबंध वाचले गेले असे दिसते. तत्संबंधीचा तपशील पुढीलप्रमाणे :

| *'निबंधांच्या विषयांचीं नांवें'* | *'ज्याणी लिहिलें त्यांचीं नांवें'* |
|---|---|
| १. सृष्टिसौंदर्याविषयीं | —भास्कर दामोदर |
| २. रसायनशास्त्राविषयीं | —वासुदेव बापू |
| ३. मराठ्यांच्या उत्कर्षापकर्षाविषयीं | —लक्ष्मण नृसिंह जोशी |
| ४. हिंदु लोकांच्या त्रिकालस्थितीविषयीं | —सखाराम दीक्षित |
| ५. सृष्टीमध्ये परमेश्वराची शक्ति दृष्टिगोचर होते याविषयीं | —दाजी परशुराम |
| ६. उद्योगाविषयीं | —विष्णु अमृतराव |
| ७. व्यवहारशास्त्राचे उद्देश आणि लाभ | —विश्वनाथ नारायण |
| ८. हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या स्थितीविषयीं | —नारायण विष्णु |
| ९. एकीपासून लाभ | —बाळ भास्कर |

* 'मराठी ज्ञानप्रसारका' चा वर्षारंभ १८५० ते १८६२ पावेतो एप्रिलमध्ये होत असे. १८६३ पासून पुढे तो जानेवारीत होऊ लागला.

| *'निबंधांच्या विषयांचीं नांवें'* | *'ज्याणी लिहिलें त्यांचीं नांवें'* |
| --- | --- |
| १०. हिंदुस्थानांतील विद्या व कला यांविषयीं | —विनायक हरिश्चंद्र |
| ११. सत्याविषयीं | —भिकाजी भास्कर |
| १२. विद्येविषयीं | —बाबाजी कृष्णनाथ |

ह्याच इतिवृत्तात पारशी ज्ञानप्रसारक सभा मराठी ज्ञानप्रसारक सभेपेक्षा अधिक चांगल्या प्रकारे कार्य करीत असल्याचे मुद्दाम नमूद केलेले आढळते.

ह्यानंतर उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेसंबंधीचे इतिवृत्त आपणांस 'ज्ञानप्रसारका'-च्या फेब्रु० १८५६ च्या अंकात आढळते. १८५६ मध्ये सभेचे चिटणीस श्री. हरिशंकर बाळकृष्ण हे होते; 'सभेनें (१) नीतिग्रंथ, (२) व्यवहारोपयोगी नाटक व (३) कृषिकर्म ह्या विषयांवरील निबंधलेखकास बऱ्याच रकमेचीं इनामें देण्याचें कबूल केले आहे' अशी घोषणा ह्या १८५६ च्या इतिवृत्तात चिटणीस करिताना आढळतात. 'ज्ञानप्रसारका'च्या ह्यापुढील म्हणजे मार्च १८५६ च्या अंकात नारायण महादेव यांनी सभासदांच्या संख्येमध्ये घट होत असल्याबद्दल चिंता व्यक्त केली असून पारशी व गुजराती उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा मराठी सभेनंतर स्थापन झालेल्या असूनही त्यांना वाढता लोकाश्रय असल्याचे नमूद केलें आहे आणि मराठी ज्ञानप्रसारक सभेचे सभासद वाढविण्यासाठी व ती अधिक कार्यक्षम करण्यासाठी मराठी भाषिकांना अगत्याने आवाहन केले आहे.

ह्यानंतर सभेच्या कामकाजासंबंधीची अधिक महत्त्वाची माहिती आपणांस गोविंद नारायण यांनी ज्ञानप्रसारक सभेपुढे दिलेल्या एका महत्त्वपूर्ण भाषणात आढळते. हे भाषण 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या ऑक्टोबर व नोव्हेंबर १८५६ च्या अंकांमध्ये छापलेले आहे. ह्या भाषणातील मुख्य मुद्दा असा आहे की, उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेच्या सभासदांनी प्रत्येक सभेला हजर राहणे व सभेचे उद्दिष्ट साधावयास मदत करणे अगत्याचे आहे. सभेला हिंदुस्थानातच नव्हे तर इंग्लंडात ईस्ट इंडिया कंपनीच्या कोर्ट ऑफ डिरेक्टरसंपर्यंत प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे असे सांगण्यात आले आहे. रा. विनायकराव वासुदेवजी, रा. नारायण दीनानाथजी, डॉ. भाऊ दाजी, डॉ. आत्माराम पांडुरंगजी, रा. विनायकराव जगन्नाथजी आणि रावसाहेब विश्वनाथ नारायण 'हे सभेचे नेत्रच आहेत.' सभेचे अध्यक्ष रा. नारायण दीनानाथजी 'सभेचा अभिमान बाळगतात.

व डॉ. आत्माराम पांडुरंग व रा. हरिश्चंद्र बाळकृष्णजी सभेच्या कल्याणाची सतत काळजी घेतात. गोविंद नारायण यांनी पुढे म्हटले आहे, "ह्या सभेकडून मराठी भाषेची सुधारणूक होऊन, तींत अनेक तऱ्हेचे ग्रंथ व्हावेत. मराठी भाषेंत सर्वसंग्रह नांवाचा एक ग्रंथ असावा, ज्यास इंग्रजीमध्यें 'सायक्लोपीडिया' म्हणतात. असे ग्रंथ आपल्या भाषेंत नसल्यामुळें ती भाषा पूर्णतेस आली नाहीं. हें काम सिद्धीस नेण्यास जर आमचे सभासद मनावर घेऊन किमानपक्ष वर्षांतून एकेक विषयावर निबंध लिहून तयार करितील तर हें कार्य सहज सिद्धीस जाईल. ह्या कार्यास राजश्री भाऊ महाजन, 'ज्ञानदर्शना'चे कर्ते, यांची व ह्यांसारिख्या दुसऱ्या विद्वानांची मदत घ्यावी." गोविंद नारायण एवढेच सांगून थांबलेले नाहीत. ह्या कार्यासाठी जे 'दहा पांच हजार रुपये' लागतील ते सहज जमविता येतील असा विश्वासही त्यांनी व्याख्यानाच्या शेवटी व्यक्त केला आहे.

२ जानेवारी १८५७ रोजी झालेल्या सभेच्या वार्षिक अधिवेशनात बोलताना गोविंद नारायण यांनी मराठीत 'सर्वसंग्रह' (Cyclopeadia) तयार करण्याविषयीची आपली कल्पना सभासदांपुढे परत एकदा आवर्जून मांडली आहे. ह्या भाषणात पुन्हा एकदा गुजराती आणि पारशी ज्ञानप्रसारक सभांमार्फत होत असलेल्या कार्याचा गौरव केला असून त्यांना मिळत असलेला वाढता लोकाश्रय लक्षात घेऊन मराठी लोकांनी आपल्या सभेस बळकटी आणण्यासाठी विशेष प्रयत्न करायला हवेत असे मुद्दाम बजावले आहे. सभासदांनी 'मराठी ज्ञानप्रसारका'-साठी लेखन करावे, ते लेखन स्वतंत्र असावे, "भाषांतर करून पाठविणें हा गौण पक्ष आहे" असे त्यांनी भाषणाचे शेवटी सभासदांना मुद्दाम सांगितले आहे.

गोविंद नारायण यांचे हे भाषण आणि 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेचा १८५६ चा रपोट' फेब्रुवारी १८५७ च्या अंकात आहेत. सभेच्या ह्या इतिवृत्तावरून पाहता १८५६ साली एकंदर सभासदांची संख्या ९७ दिसते. ह्या वर्षांत २२ नव्या सभासदांची भर पडली असल्याची नोंद आहे. एकंदर सभासदांमध्ये ५ मुंबईबाहेरील आहेत. १८५६ ह्या वर्षात सभेच्या एकंदर २१ बैठकी झाल्या व त्यांत पुढील बारा निबंध वाचले गेले असे दिसते :

१. मनुष्याविषयीं कांहीं विचार —मोरोबा सुंदर
२. ज्ञानप्रसारक सभेची हल्लीची स्थिति —नारायण महादेव
३. हिंदुस्थानातील व्यापार वाढला की नाही ? —विष्णु मोरेश्वर

४. सृष्टींतील दर्शनचमत्कार —हरिशंकर बाळकृष्ण
५. शास्त्रांच्या अभ्यासापासून लाभ —वासुदेव जगन्नाथ
६. क्रियेवाचून ज्ञान पंगू, भाग २ —केशव जनार्दन
७. राजा राममोहन रॉय यांचा वृत्तांत : भाग १ —भास्कर हरी
८. शरीरसंपत्तिरक्षणाचे नियम —डॉ. आत्माराम पांडुरंग
९. सवयी —रा. सा. विश्वनाथ नारायण
१०. राजा राममोहन रॉय, भाग २ —भास्कर हरी
११. हिंदुस्थानावर रूपक —शांताराम नारायण
१२. 'उद्भिज्जजन्य पदार्थ' या ग्रंथांतील उपोद्घात व प्रस्तावना —गोविंद नारायण

वरील निबंधांखेरीज ह्या वर्षांत सभेपुढे पुढील व्याख्याने झाली :

१. उद्भिज्जविद्येवर ५० व्याख्याने —गोविंद नारायण
२. देशव्यवहारव्यवस्थाशास्त्र (१ व्याख्यान) —केशव सखारामशास्त्री
३. मानसशास्त्रावर उपोद्घातरूप १ व्याख्यान —रें. नारायण शेषाद्रि
४. रसायनशास्त्रावर २ व्याख्यांने —हरिशंकर बाळकृष्ण

ह्या वर्षी सभेचे उपाध्यक्ष गोविंद नारायण आणि चिटणीस हरिशंकर बाळकृष्ण हे होते. 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिकाचे काम मुख्यत्वेकरून रा० भास्कर हरि हे पाहत होते.

'ज्ञानप्रसारका'च्या एप्रिल १८५७ च्या अंकात वामन आबाजी मोडक ('एल्फिन्स्टन् विद्यालयातील विद्यार्थी') यांचा 'स्वदेशाभिमानाविषयीं विचार' हा निबंध प्रसिद्ध झाला असून त्याचे शेवटी त्यांनी ज्ञानप्रसारक सभेच्या सभासदांनी सभेचा अभिमान बाळगावा व सभेच्या उत्कर्षासाठी झटावे अशी कळकळीची विनंती केली आहे. ह्याही लेखात पारशी ज्ञानप्रसारक सभेचे उदाहरण सभासदांनी डोळ्यांसमोर ठेवावे अशी सूचना आहे. जुलै १८५७ च्या अंकात 'सरकारच्या सूचनेवरून' 'ज्ञानप्रसारक' मासिकात सुधारणा घडवून आणल्याचा उल्लेख आहे; ही सुधारणा म्हणजे मुद्रणासाठी पूर्वीपेक्षा लहान ठसा वापरून मासिकाच्या मजकुरांत केलेली वाढ ही होय. ज्ञानप्रसारक सभेचे १८५७ चे इतिवृत्त पाहता 'मराठी ज्ञानप्रसारक' ह्या मासिकाला राज्याश्रय होता असे दिसते. सरकार सदर मासिकाच्या महिन्याला १२४ प्रती विकत घेत असे.

ह्याच इतिवृत्तात सभेचे उपाध्यक्ष गोविंद नारायण हे सभेसाठी करीत असलेल्या कार्यांचा अत्यंत गौरवपर उल्लेख आहे. मात्र सभासदांची संख्या ९७ वरून ७६ वर आलेली दिसते. गोविंद नारायणांनी ह्या वार्षिक सभेपुढे केलेल्या भाषणात सभेचे कार्य चालू ठेवण्यासाठी प्रत्येक सभासदाने काय करावयास हवे ते सांगितले असून मराठी भाषेत लेखन करण्याची त्यास आग्रहाची विनंती केली आहे. गोविंद नारायणांनी सभासदांना स्वभाषेत ग्रंथरचना करण्याची आवश्यकता पटावी एवढ्यासाठी इंग्रजी व स्पॅनिश भाषांचे उदाहरण पुढे केले आहे. (विवेचनाच्या ओघात मात्र चुकून डॉन क्विक्झोटचा उल्लेख 'एक सुरस नाटक' असा केला असून मराठी कवींमध्ये 'जगन्नाथराय' यांस स्थान दिलें आहे.) भाषणाच्या शेवटी बाळ गंगाधरशास्त्री यांचा उल्लेख केला असून त्यांना इंग्रजी भाषेत 'उत्कृष्ट गम्य' होते हे खरे असले तरी 'त्यांला संस्कृत व मराठी स्वभाषा पूर्ण येत असत' व म्हणून विद्वान इंग्रज त्यांची स्तुती करीत असे म्हटले आहे.

ह्यानंतर 'मराठी ज्ञानप्रसारका'त जे सभेचे महत्त्वाचे इतिवृत्त आढळते ते एप्रिल १८५९च्या अंकातील. हे इतिवृत्त 'स्टूडेन्टस् लिटररी आणि सायंटिफिक सोसायटी'च्या १८५७–५८ मधील कार्यांचे इतिवृत्त आहे. त्यात सदर मंडळीच्या वेगवेगळ्या शाळांची माहिती आहे. ह्या सोसायटीच्या व्यवस्थापक मंडळात सर्व जातींची व धर्मांची माणसे कशी आहेत तें आवर्जून सांगितले आहे. ज्या सद्गृहस्थांनी मुलींच्या शाळा स्थापन करण्यास आणि चालविण्यास मदत केली त्यांची नावे व त्यांनी केलेल्या मदतीचा तपशील आहे. त्यांत भाऊ दाजी, जगन्नाथ शंकरशेट, मंगळदास नथूभाई, हेमाबाई बखतचंद, नारायण दीनानाथजी, विनायकराव वासुदेवजी इत्यादींनी केलेल्या आर्थिक मदतीचा साभार उल्लेख आहे. मंडळीच्या शाखांमध्ये 'उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक' व 'गुजराती बुद्धिवर्धक' ह्या सभांचा उल्लेख आहे. ह्याच इतिवृत्तात 'गुजराथी ज्ञानप्रसारक' सभा १८५७ पासून बंद असल्याचा उल्लेख आहे; परंतु त्याबरोबरच 'गुजराथी बुद्धिवर्धक' सभेने मार्च १८५६ पासून आपले मासिक सुरू केल्याची माहिती आहे.[२]

---

२. ह्याच इतिवृत्तात आणखी एक महत्त्वाची नोंद आहे. ही नोंद मराठीत निघालेल्या पहिल्या मुलींच्या मासिकासंबंधी होय. 'मराठी मुलींचे पुस्तक' ह्या खास

ता. १९ ऑगस्ट १८५९ रोजी गोविंद नारायण यांनी आणखी एक भाषण सभेपुढे केलेले दिसते. ह्या भाषणात त्यांनी फिरून एकदा सभासदांच्या वाढत्या अनास्थेविषयी तीव्र शब्दांत नापसंती व्यक्त केली असून नारायण दीनानाथजी, भास्कर दामोदर, रा. सा. विश्वनाथ नारायण व रा. सा. नारायण-भाई इत्यादींचे कित्ते इतर सभासदांनी गिरवावेत असे सुचविले आहे. भाषणाच्या शेवटी 'ज्ञानप्रसारक सभे'चे सभासद साधारणतः तरुण विद्यार्थी असतात एवढ्यासाठी प्रौढ विद्वानांनी सभेकडे दुर्लक्ष करू नये असे मुद्दाम बजावले असून 'आमच्या लोकांच्या ठिकाणीं जी खुशामतखोर वृत्ति वाढत आहे' तिचा त्याग करून त्यांनी विद्येच्या मार्गानें 'राजमान्य व सुखी व्हावें' अशी शिफारस केली आहे.

ह्यानंतर आपणांस जे सभेच्या कामाचे इतिवृत्त आढळते ते 'ज्ञान-प्रसारका'च्या मे १८६० च्या अंकात. ते सभेने १८५९ साली केलेल्या कामाचे इतिवृत्त आहे. १८५९ साली सभेपुढे फक्त तीन निबंध वाचले गेले असे दिसते. ते तीन निबंध पुढील होत :

१. तरुण शिकलेल्या लोकांचीं कर्तव्यकर्में —महादेव गोविंद (रानडे)
२. ज्ञानसंपादनार्थ अवलोकनाची आवश्यकता —शांताराम नारायण
३. १६८८ मध्यें विलायतेंत राज्याची जी घडामोड झाली तिजविषयीं —विनायक जनार्दन (कीर्तने)

ह्या वर्षात सभेपुढे दिली गेलेली व्याख्याने :

१. ज्ञानवृद्धि —गोविंद नारायण
२. तंत्रशास्त्र (mesmerism) —नारायण दीनानाथजी
३. सुलेखनविद्या —गोविंद नारायण

१८६० सालाकरिता सभेचे व्यवस्थापक मंडळ पुढीलप्रमाणे होते : अध्यक्ष—नारायण दीनानाथजी, उपाध्यक्ष—गोविंद नारायण, 'जॉइंट चिटणीस' : विश्वनाथ

---

शीर्षकाखाली ही नोंद आपणास आढळते. ह्या मासिकाचे नाव 'सुमित्र' असून ते मंडळीचे 'मोठे हुशार मराठी चिटणीस' रा. रामचंद्र गोपाळ हे मंडळीतर्फे चालवीत असून त्याचा मासिक खर्च अवघा रु. ३५ असल्याची माहिती आहे; व एवढा अत्यल्प खर्चही मासिकाच्या विक्रीतून भागत नाही अशी तक्रार आहे.

नारायण मंडलीक आणि भास्कर हरी भागवत. खजिनदार : शांताराम नारायण. पुस्तके ठेवणार : नारायण महादेव परमानंद; व्यवस्थापक सभासद : भास्कर दामोदर, हरीशंकर बाळकृष्ण, पांडुरंग बळीभद्र, रामकृष्ण गोपाळ भांडारकर, बाळा मंगेश.[३]

ह्यानंतरची 'मराठी ज्ञानप्रसारक' आणि 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा' यांच्या संबंधीची महत्त्वाची नोंद आपणांस 'ज्ञानप्रसारका'च्या ऑक्टोबर १८६० च्या अंकात आढळते. ह्या अंकाला जे संपादकीय जोडलेले आहे ते ह्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. त्यात 'मराठी ज्ञानप्रसारका'ची पुनर्व्यवस्था करण्यात आली असून त्यात 'एल्फिन्स्तन कॉलेजातील नवीन विद्यार्थी व दुसरे पुष्कळ विद्वान गृहस्थ' असल्याची बातमी दिली असून 'इतोत्तर हें पुस्तक' वेळच्या वेळी निघत जाईल असे आश्वासन दिले आहे. द्रव्याभावी हे पुस्तक चालविणे कसे कठीण होत आहे हे पुढे सांगितले असून त्यास सर्वांनी मदत करावी अशी विनंती केली आहे. ह्या संपादकीयाखालींच संपादकांनी एक ताजा कलम लिहिला आहे. त्यात 'गुजराती ज्ञानप्रसारका'च्या ('गुजराती बुद्धिवर्धक ग्रंथ'?) 'सुमारे ५००' प्रती दर महिन्यास निघतात व 'त्यांतील बहुतेक पारशी गृहस्थांमध्यें खपतात व तेणेंकरून त्यांस हवें तितकें द्रव्य वापरावयास मिळतें' अशी माहिती आहे; परंतु त्याहीपेक्षा महत्त्वाची माहिती अशी की, "जर कोणी सुबोध भाषेंत एखाद्या चांगल्या विषयावर निबंध लिहिलेला असला तर ह्या पुस्तकाचे मालक त्यास योग्यतेनुसार द्रव्य देऊन तो विकत घेऊन पुस्तकांत छापतात." लेखनाला मोबदला देण्यास मराठी मासिकांच्या अगोदर गुजरातीने

---

३. 'ज्ञानप्रसारका'च्या ऑक्टोबर १८५९ च्या अंकात एक स्फुट आहे. त्यात मुंबई व पुणे येथे झालेल्या 'मात्रिक्युलेशन' परीक्षेत जे १२० पैकी २२ उमेदवार उत्तीर्ण झाले त्यांची नावे असून त्यांत एकाही पारशी उमेदवाराचे नाव का नाही याचा खुलासा आहे. सर्व पारशी उमेदवार गुजरातीच्या प्रश्नपत्रिकेत नापास झाले हे त्याचे कारण म्हणून दिले आहे. उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांत वीस मराठी व केवळ दोन गुजराती आहेत. उत्तीर्णांमध्ये महादेव गोविंद रानडे, रामचंद्र गोपाळ भांडारकर, बाळा मंगेश, नारायण महादेव परमानंद व जनार्दन सखाराम ही नावे आहेत. हे सगळेच पुढे ज्ञानप्रसारक सभेचे सभासद झालेले आढळतात. हे सर्वच स्फुट अत्यंत वाचनीय आहे.

प्रारंभ केला होता असे ह्या माहितीवरून वाटते. "'मराठी ज्ञानप्रसारका'च्या प्रति दर महिन्यास ३०० खपणें मुष्किल पडतें" ही संपादकांच्या दृष्टीनें 'अतिशय लांछनाची गोष्ट आहे.' ह्या संपादकीयाच्या शेवटी आणखी एक माहिती आढळते. संपादक लिहितात, "'बामदाद' म्हणून गुजराथीमध्यें दुसरें एक पुस्तक निघतें, त्याच्या दरमहा सुमारें सातशें प्रति निघतात."

'ज्ञानप्रसारक सभेच्या' १८६० मधील कार्याचे इतिवृत्त फेब्रुवारी १८६१ च्या अंकात छापलेले आढळते. त्यावरून १८६० साली सभासदांची संख्या ९९ होती असे दिसते. ह्या साली सभेपुढे वाचलेल्या निबंधांमध्ये पुढील महत्त्वाचे निबंध आढळतात.

१. इंग्लंड देशाचा राजा पहिला चार्लस याची कारकीर्द —महादेव मोरेश्वर कुंटे
२. रेशमी रुमाल —गोविंदजी नारायण
३. मराठी राजेरजवाडे —महादेव गोविंद रानडे
४. महाबळेश्वराचे वर्णन —जनार्दन सखाराम गाडगीळ
५. वॉरन हेस्टिंग्ज यांचा वृत्तांत —वामन आबाजी मोडक
६. तरुण बंगाली लोक —वामन आबाजी मोडक
७. मराठी राज्य —विठ्ठल नारायण पाठक

ह्या वर्षी सभेचे चिटणीस नारायण महादेव परमानंद हे होते, आणि 'मराठी ज्ञानप्रसारका'चे काम विनामूल्य केल्याबद्दल सभेने संपादकाला (भास्कर हरी भागवत) मोल्सवर्थकृत मराठी व इंग्रजी आणि कँडीकृत इंग्रजी आणि मराठी हे दोन कोश भेटीदाखल दिले ही नोंद सदर इतिवृत्तात सापडते. ह्याच अंकात शेवटी "विनायक जनार्दन कीर्तने, एल्फिन्स्तन कॉलेजांतील विद्यार्थी यांणीं 'थोरले माधवराव' यावर रचलेलें नाटक गेल्या ज्ञानप्रसारक सभेंत वाचलें, तें फार चांगलें उतरलें. हें नाटक ज्ञानप्रसारक मंडळी पुस्तकांत एकदम किंवा निराळें छापून प्रसिद्ध करणार आहे." अशी टीप आढळते. (कीर्तने यांचे 'थोरले माधवराव' हे नाटक 'मराठी ज्ञानप्रसारकां'त छापले गेले नाही. ते पुस्तकरूपानेच प्रसिद्ध झाले.)

ज्ञानप्रसारक मंडळीच्या १८६१–६२ मधील कामकाजाचे इतिवृत्त डिसेंबर १८६२ च्या अंकात प्रसिद्ध झाले आहे. ह्याच इतिवृत्तात इ० स० १८६२–

६३ मध्ये जे निबंध वाचले जाणार होते व जी व्याख्याने दिली जाणार होती त्यांचीही यादी आढळते. १८६१ साली सभेचे अध्यक्ष : डॉ० भाऊ दाजी, उपाध्यक्ष : गोविंद नारायण आणि महादेव गोविंदशास्त्री; व्यवस्थापक मंडळाचे सभासद : विश्वनाथ नारायण मंडलीक, बाळा मंगेश वागळे, नारायण महादेव परमानंद, जनार्दन सखाराम गाडगीळ आणि चिटणीस—माधव नारायण शिरगांवकर हे होते असे दिसते. सभेला ह्या वर्षी इंदूरचे श्री० दाजीसाहेब किबे यांनी २२५ रुपयांची देणगी दिल्याचा उल्लेख आढळतो. १८६१–६२ मध्ये सभेपुढे वाचलेले निबंध व दिली गेलेली व्याख्याने :

१. शारीरशास्त्र —डॉ. आत्माराम पांडुरंग.
२. नीतिशास्त्राच्या अभ्यासापासून लाभ आणि नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें —रा. सा. महादेव गोविंदशास्त्री
३. आमची मध्यंतरीय स्थिति —रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलीक
४. हिंदुस्थानांतील कारीगर —गोविंदजी नारायण
५. रसायनशास्त्राच्या अभ्यासापासून आनंद —रा. सा. महादेव गोविंदशास्त्री

'१८६२–६३ च्या सेशनांत निबंध वाचावयाचे व व्याख्याने द्यावयाचीं त्यांचे विषय व वाचणारांचीं नांवें :'

१. ज्ञानप्रसारक सभेची हकीकत —रा. सा. वि. ना. मंडलीक
२. लिहिण्याची शैली —जनार्दन सखाराम
३. हिंदुस्थानांतील कापसाचा व्यापार —गोविंदजी नारायण
४. नीतिशास्त्र —रा. सा. महादेव गोविंदशास्त्री
५. ठक लोकांचा वृत्तांत —बाळा मंगेश वागळे
६. विद्युल्लता —बाळा मंगेश वागळे
७. मराठे व बंगाली लोकांचा (च्या) भावी उत्कर्षाची चिन्हे व त्यांची तुलना —महादेव गोविंद रानड्ये
८. तिबेटाचें मैदान —महादेव मोरेश्वर कुंटे
९. नाटक —विनायक जनार्दन (कीर्तने)
१०. इ० स० १४ व्या व १५ व्या शतकांतील युरोपाची स्थिती व एकोणिसाव्या शतकांतील हिंदुस्थानची स्थिति —वामन आबाजी मोडक
११. मराठी भाषेंतील ग्रंथसमुदाय व त्यापासून कांहीं अनुमान —विष्णु सदाशिव

फेब्रुवारी १८६३ या 'ज्ञानप्रसारका'च्या अंकात सभेच्या १५ व्या वाढदिवशी रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलीक यांनी ज्ञानप्रसारक सभेच्या स्थापनेसंबंधीची जी महत्त्वपूर्ण हकीकत वाचून दाखविली ती सभेसंबंधीच्या हकीकतीच्या प्रारंभीच्या परिच्छेदांतूनच आली आहे. मराठी ज्ञानप्रसारक सभा स्थापन झाल्यानंतर १७ महिन्यांनी 'मराठी ज्ञानप्रसारक' हे मासिक सुरू झाल्याचे ह्याच हकीकतीत मंडलिकांनी सांगितले आहे.[४] मंडलिकांच्या मते 'मराठी ज्ञानप्रसारक' "अद्यापिही (१८६३) बाल्यावस्थेंत आहे; अथवा एका रीतीनें पाहूं गेलें असतां त्याची वाढ खुंटून त्यास जरा लागली आहे, असेंही म्हटलें असतां चालेल." रा० सा० मंडलिकांच्या मते प्रारंभीचा उत्साह पुढे टिकला नाही व म्हणूनच सभेला आणि 'मराठी ज्ञानप्रसारका'ला पुढे अवकळा आली. ही अवकळा नष्ट व्हावी आणि सभेला व 'ज्ञानप्रसारकाला' अधिक प्रतिष्ठा प्राप्त व्हावी एवढ्यासाठी स्मरणादाखल त्यांनी १८५०, १८५१ व १८५२ ह्या पहिल्या तीन वर्षांत 'ज्ञानप्रसारका'त जे महत्त्वाचे निबंध वाचले गेले त्यांची यादी सभेला सादर केली आहे आणि सभासदांनी तिजवरून स्फूर्ति घेऊन उत्साहाने विविध अभ्यासविषयांवर निबंधलेखन करावे असे आग्रहपूर्वक बजावले आहे. रा. सा. मंडलीक यांचे हे भाषण फारच मोलाचे आहे. आपण जी यादी सादर केली आहे त्या यादीतील केरो लक्ष्मण यांच्याखेरीज "बाकी बहुतेककरून सर्व निबंध शाळेंत असणाऱ्या लोकांनीं केलेले आहेत" ही गोष्ट त्यांनी सभासदांच्या मुद्दाम लक्षात आणून दिली आहे.

ह्यानंतरच्या 'ज्ञानप्रसारका'च्या अंकांतून जे सभेचे वृत्तांत आढळतात ते बरेच त्रोटक स्वरूपाचे आहेत. जून १८६३ च्या अंकात जो सभेचा वृत्तांत आहे त्यात एके ठिकाणी 'राजश्री महादेव गोविंद रानडे बी. ए.' यांणीं 'मराठे व बंगाली लोकांच्या भावी उत्कर्षाचीं चिन्हें व त्यांची तुलना' या विषयावर सुरस

४. 'ज्ञानप्रसारका'च्या अगदी पहिल्या अंकात (एप्रिल १८५०) संपादक लिहितात : "पुस्तक छापूं लागण्यास उशीर कां झाला? तर या प्रश्नाचें उत्तर वास्तविक देण्यास आम्हांस फार लज्जा वाटते, कारण यथार्थ उत्तर द्यावें तर स्वदेशीय लोकांच्या ठायीं जीं व्यंगें किंवा दोष आहेत ते चांगल्या रीतीनें लोकप्रसिद्धीस येतील."

निबंध वाचला' आणि 'रा. महादेव मोरेश्वर कुंटे यांणीं 'ज्ञान हेंच मुख्य सूत्र' या विषयावर कविताबद्ध एक निबंध वाचला' असा उल्लेख आहे. ह्यानंतरचे सभेचे वृत्त आपणांस नोव्हेंबर व डिसेंबर १८६३ च्या अंकांतून त्रोटक स्वरूपात आढळते. त्यात 'चांगल्या जागेची अडचण' आणि 'रसायन व पदार्थविज्ञान-शास्त्रांचा प्रयोग करण्याच्या साधनांची उणीव' असल्याचे नमूद केलेले आढळते. श्री. रामचंद्र विष्णू माडगावकर यांस सभासद करून घेतल्याचे दिसते. १८६३ साली सभेचे अध्यक्ष राजश्री गोविंद नारायण माडगावकर हे होते असे आढळते. मार्च १८६४ च्या 'ज्ञानप्रसारका'च्या अंकात जे सभेचे त्रोटक इतिवृत्त प्रसिद्ध झालेले आहे त्यात १८६४ साली सभेचे अध्यक्ष रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलीक आणि चिटणीस रा. माधव नारायण शिरगावकर हे होते अशी नोंद आहे. मला उपलब्ध झालेला 'मराठी ज्ञानप्रसारका'चा शेवटला अंक नोव्हेंबर १८६६ ह्या महिन्याचा आहे. त्यानंतरचे 'ज्ञानप्रसारका'चे अंक मला उपलब्ध झाले नाहीत. मार्च १८६४ ते नोव्हेंबर १८६६ च्या दरम्यानच्या एकाही अंकात 'ज्ञानप्रसारक सभे'चे वृत्त आढळत नाही. मार्च १८६४ त आढळते ते सभेचे शेवटचे वृत्त.

'ज्ञानप्रसारक' हे मासिक केव्हातरी १८६६ अखेर किंवा १८६७ मध्ये बंद पडले असले तरी उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेचे कार्य त्यानंतरही चालू होते असे आढळून येते. 'विविधज्ञानविस्तारा'च्या १८७५ सालातील अंकांतून आपणांस ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचलेले निबंध छापलेले आढळतात. 'भरतखंडाच्या निकृष्टावस्थेचीं कारणें आणि उत्कर्षाचे उपाय' हा श्री० रा० भि० गुंजीकर यांचा निबंध १९ मार्च १८७५ रोजी सभेपुढे वाचला गेला होता; तो त्या वर्षीच्या 'विविधज्ञानविस्तारा'च्या एका अंकात संपूर्णपणे छापलेला आढळतो. ह्यानंतरच्या 'विस्तारा'च्या अंकांतून सभेपुढे वाचले गेलेले निबंध आढळतात की नाही ह्याचा शोध मी घेऊ शकलो नाही; परंतु वर उद्धृत केलेल्या सभेच्या अनेक इतिवृत्तांवरून १८५० ते १८६६ ह्या सोळा वर्षांच्या काळात उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभेने ज्ञानाच्या विविध क्षेत्रांत प्रौढ विद्यार्थ्यांना, सुशिक्षितांना आणि विद्वानांना अभ्यास करायला लावून जे लोकशिक्षणाचे अपूर्व कार्य केलेले आढळते त्याचे महत्त्व लक्षात येण्याजोगे आहे. अशा प्रकारच्या सभेचे 'मराठी ज्ञानप्रसारक' हे मुखपत्र असल्यामुळे त्यात प्रसिद्ध झालेल्या लेखनात अभ्यासविषयांची विविधता आढळून येत असल्यास नवल नाही;

आपणांस त्यात जवळजवळ सर्वच ज्ञानाशाखांतील विविध प्रश्नांवर लेखन झालेले आढळते. ह्या सर्व लेखनांत अभ्यासविषय समजून घेण्याची व देण्याची तीव्र इच्छा दिसून येते. विविध ज्ञानशाखांशी संबद्ध असलेल्या परिभाषेची अडचण लेखकांना पडली आहे असे कोठेच आढळत नाही. कृषि, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञान, आरोग्यविज्ञान, शरीरशास्त्र, प्राणिशास्त्र, सामान्य-विज्ञान, भूगोलशास्त्र ह्या शास्त्रांबरोबरच अर्थशास्त्र, समाजशास्त्र, इतिहास, राज्यशास्त्र इत्यादी सामाजिक शास्त्रांतील अनेक प्रश्नांचा त्यात विचार केलेला आढळतो. ह्याखेरीज जे ह्यांपैकी कोणत्याही शास्त्रांत बसू शकत नाहीत असे अनेक विषयांवरील अत्यंत माहितीपूर्ण लेख 'ज्ञानप्रसारका'ने प्रसिद्ध केले आहेत असे दिसून येते.

हे झाले निबंधात्मक लेखनासंबंधी. 'ज्ञानप्रसारका'ने हे चर्चात्मक आणि माहिती पुरविणारे महत्त्वाचे लेखन प्रसिद्ध करीत असता ललितलेखनाकडे दुर्लक्ष केले नाही. त्याने विविध प्रकारच्या ललितलेखनालाही सतत स्थान देण्याचा प्रयत्न केला. कविता, कथा, कादंबरी, नाटक, विनोदी लेखन, चरित्रात्मक लेखन, स्थलवर्णनात्मक लेखन इत्यादी लेखनालाही त्याने सतत मानाचे स्थान दिले. त्याने काही संस्कृत ग्रंथांची भाषांतरेहि प्रसिद्ध केली, तत्त्वज्ञानात्मक लेखनाला उत्तेजन दिले आणि विशेष लक्षात घेण्याजोगी गोष्ट अशी की, अनेक भाषाविषयक प्रश्नांचाही वेळोवेळी विचार केला. राहता राहिला वाङ्मयविचार; तो 'ज्ञानप्रसारका'ने केला नसता तरच नवल; पुस्तकपरीक्षणे आणि काही महत्त्वाच्या वाङ्मयीन प्रश्नांचा विचार ह्यांच्यामार्फत त्याने ही उणीवही आपल्यात राहू दिलेली नाही. 'ज्ञानप्रसारका'ने केलेला वाङ्मयविचारही अत्यंत लक्षणीय आहे.

१८६७ नंतर 'विविधज्ञानविस्तारा'ने आणि इतर महत्त्वाच्या मराठी नियतकालिकांनी जे कार्य केलेले आढळते त्याचा अत्यंत मजबूत पाया 'मराठी ज्ञानप्रसारका'ने तत्पूर्वीच कसा घातला होता ह्याची सुस्पष्ट कल्पना यावी एवढ्यासाठी वर उल्लेखिलेल्या विविध ज्ञानशाखांतील आणि साहित्यप्रकारांतील 'मराठी ज्ञानप्रसारका'त प्रसिद्ध झालेल्या महत्त्वपूर्ण लेखनाच्या याद्या खाली देत आहे.

*प्रकरण २ : परिशिष्ट*

## वनस्पतिशास्त्र : शेतकी इत्यादी...

| *क्रमांक* | *पुस्तकाचे नांव* | *पुस्तक* | *अंक* | *काल* |
|---|---|---|---|---|
| १) | शेतकीविद्येविषयीं प्रश्नोत्तरावलि : | ४ | ३ | जून १८५३ |
| २) | तृणाविषयीं... | ५ | ५ | ऑगस्ट १८५४ |
| ३) | ऊस व त्याजपासून उत्पन्न होणारे पदार्थ | ५ | ९ | डिसेंबर १८५४ |
| ४) | उद्भिज्यविद्या, बीज आणि अंकुर व मोड — गोविंदजी नारायण | ७ | १ | एप्रिल १८५६ |
| ५) | उद्भिज्यविद्या (व्याख्यान २ रे) मुळे आणि पाळे, बुंद, कांड, खोड आणि साल — गोविंदजी नारायण | ७ | ४ | जुलै १८५६ |
| ६) | उद्भिज्यविद्या (व्याख्यान ३ रे) कांडाच्या आतील रचना व रसग्राह्यकाष्ट, पाने... — गोविंदजी नारायण | ७ | ६ | सप्टें. १८५६ |
| ७) | व्याख्यान (४) फुले, कळी, फळे... — गोविंदजी नारायण | ७ | ७ | आक्टो. १८५६ |
| ८) | व्याख्यान ४ ,, | ७ | ७८ | नोव्हें. १८५६ |
| ९) | व्याख्यान ५ ,, | ७ | १० | जाने. १८५७ |

## तत्त्वज्ञान

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | दुःखाविषयी... | ४ | ११ | फेब्रु. १८५४ |
| २) | तत्त्वज्ञानातील गूढे | ८ | ३ | जून १८५७ |
| ३) | ,, ,, | ८ | ४ | जुलै १८५७ |
| ४) | नीतीविषयी साधारण विचार | ८ | ७ | ऑक्टो. १८५७ |
| ५) | ,, ,, ,, | ८ | ८ | नोव्हें. १८५७ |
| ६) | ,, ,, ,, | ८ | ९ | डिसें. १८५७ |
| ७) | ,, ,, ,, नारायण केशव | ८ | १० | जाने. १८५८ |
| ८) | ,, ,, ,, | ८ | ११ | फेब्रु. १८५८ |
| ९) | ,, ,, ,, | ८ | १२ | मार्च १८५८ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| १०) | एका साधूची वाणी (विदुरनीतीतील एक उतारा) | १२ | ११ | जाने. १८६१ |
| ११) | मनुष्याचा अशाश्वतपणा... | १२ | ७ | ऑक्टो. १८६१ |
| १२) | साक्रेटीस (उपोद्घात: क्रिटो आणि साक्रेटीस यांच्या संवादाविषयी) | १५ | ७ | जुलै १८६४ |
| १३) | ,, ,, ,, | १५ | ८ | ऑग. १८६४ |
| १४) | श्रीसांप्रदायी किंवा रामानुज या मताची हकीकत (इंग्रजी ग्रंथाधारे) | १६ | ५ | मे १८६५ |
| १५) | सुखदु:खाविषयी विचार (संवादात्मक) | १६ | ७ | जुलै १८६५ |
| १६) | मनुष्याच्या मूलप्रकृतींचे परस्पर साम्य व त्याचा सुखाशी संबंध. | १७ | ३ | मार्च १८६६ |
| १७) | मनुष्याचे ऐहिक कर्तव्यकर्म | १७ | ७ | जुलै १८६६ |
| १८) | सुखाविषयी साधारण विचार | १७ | ८ | ऑग. १८६६ |

## रसायनशास्त्र

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | रसायनशास्त्राविषयी निबंध | २ | २ | मे १८५० |
| २) | रसायनशास्त्राविषयी विचार — मुकुंदराव भास्करजी | २ | १ | एप्रिल १८५१ |
| ३) | रसायनशास्त्र — उपोद्घात — अमिश्र पदार्थांचे कोष्टक — शास्त्राचें स्वरूप व उद्देश — पृथक्करण व संयोगीकरण, स्नेहाकर्षकत्व व रसायनाकर्षण, रसायनाकर्षणाचे दोन प्रकार, रसायन संयोगाचे नियम, परमाणुविषयक सिद्धांत | ३ | १ | एप्रिल १८५२ |
| ४) | रसायनशास्त्र — ऑक्सिजन, त्याचा इतिहास, तो वायु करण्याची रीती, त्याचें गुणधर्म व उपयोग | ३ | २ | मे १८५२ |
| ५) | फॉस्फरस — भास्कर दामोदर पाध्ये | ३ | ७ | ऑक्टो. १८५२ |
| ६) | ,, ,, | ३ | ११ | फेब्रु. १८५३ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ७) | गाल्व्हानिक व्हाल्टेइक् अथवा रसायन विद्युल्लता | ६ | ११ | फेब्रु. १८५६ |

## प्राणीशास्त्र

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| १) | पक्षी व त्याचे घरटे यांची रचना | ४ | ४ | |
| २) | मासे व समुद्रातील दुसरे प्राणी यांविषयी वर्णन (प्रेटल, हेरिंग इ.) | ४ | ६ | |
| ३) | घोड्याविषयी वर्णन... | ४ | १० | |
| ४) | वाघाविषयी ... | ४ | ११ | मे |
| ५) | जीवमात्रशास्त्र ... शामराव पांडुरंग | ६ | ८ | नोव्हें. |
| ६) | चमत्कारिक जातीचा वानर... | १० | ४ | जुलै |
| ७) | कावळ्याचा घरोटा... | १२ | ३ | जून |
| ८) | मधमाशांचे वर्णन... | १३ | १ | एप्रिल |
| ९) | मधमाशांचे वर्णन... | १३ | २ | मे १८६२ |

## भूगोलविषयक

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| १) | पार्थिव व्यवस्था (Physical Geography) | ४ | ५ | ऑग. १८५३ |
| २) | भूचक्राची दैनंदिन गति... | ४ | ६ | सप्टें. १८५३ |
| ३) | इंग्लंडातील अद्भुत धुके व बर्फ | ४ | ६ | सप्टें. १८५३ |
| ४) | इंग्लंडातील पाण्याचा कालवा... | ४ | ६ | सप्टें. १८५३ |
| ५) | पर्वताविषयी | ५ | ६ | सप्टें. १८५४ |
| ६) | जमेका बेटातील रायल बंदर येथील भूकंप | ५ | ९ | डिसें. १८५४ |
| ७) | क्षितिरचनाशास्त्र – पांडुरंग बळिभद्र | ६ | ६ | सप्टें. १८५५ |
| ८) | चिनई लोकांविषयी | ७ | ५ | ऑग. १८५६ |
| ९) | चिनई लोकांच्या रीतीभाती | ७ | ९ | डिसें. १८५६ |
| १०) | चिनई लोकांच्या बाह्योपचारादिक चाली आणि मनोरंजक प्रकार... | ७ | १० | जानेवारी १८५७ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव आणि लेखक | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ११) | चिनई लोकांविषयी | ७ | १२ | मार्च १८५७ |
| १२) | फार्मोसा बेटाचे वर्णन : (ही हकीकत ओरिएंटल क्रिस्तियन् स्पेक्टेटर या मासिक पुस्तकातून मराठीत उतरून एका विद्यार्थ्याने पाठविली, ती आदराने प्रसिद्ध केली आहे.) | १३ | ३ | जून १८६२ |
| १३) | सिंध व तेथील लोक—नारायण महादेव परमानंद | १५ | ९ | सप्टें. १८६४ |
| १४) | वऱ्हाड प्रांताचे वर्णन—रामचंद्र आनंदराव उदास | १६ | १ | जाने. १८६५ |
| १५) | वऱ्हाड प्रांताचे वर्णन—रामचंद्र आनंदराव उदास | १६ | २ | फेब्रु. १८६५ |
| १६) | इराण देशाची सांप्रतची स्थिती | १६ | ७ | जुलै १८६५ |
| १७) | लंका | १६ | ८ | ऑग. १८६५ |
| १८) | भूगोलाविषयी | १६ | ९ | सप्टें. १८६५ |
| १९) | भूगोलाविषयी | १६ | १० | आक्टो. १८६५ |
| २०) | भूगोलाविषयी | १७ | २ | फेब्रु. १८६६ |

## राज्यशास्त्र; शासनव्यवस्था इ.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | राज्यस्थिती व लोकांची वर्तणूक | ५ | ३ | जून १८५४ |
| २) | देशव्यवहारशास्त्र (निष्फल श्रमांविषयी) | ६ | ५ | ऑगस्ट १८५५ |
| ३) | देशव्यवहारव्यवस्थाशास्त्राची मूलतत्त्वे | ६ | ८ | नोव्हेंबर १८५५ |
| ४) | ,, ,, | ६ | ९ | डिसेंबर १८५५ |
| ५) | राज्य (राज्याचे निरनिराळे प्रकार, त्यांतून प्रत्येकापासून उद्भवणारे लाभ आणि त्याचा इतिहास) | ७ | ९ | डिसेंबर १८५६ |
| ६) | सरकाराची कामे (आडाम स्मिथवर आधारलेले विस्तृत विवेचन) | ७ | ११ | फेब्रु. १८५७ |
| ७) | मनुष्याचे हक्क—शांताराम नारायण | ९ | १ | एप्रिल १८५८ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ८) | मनुष्याचे हक्क – शांताराम नारायण | ९ | २ | मे १८५८ |
| ९) | डाक्तर भाउ दाजी यांनी टाउनहॉलात भरलेल्या सभेत लैसेन्स बिल याच्याविरुद्ध केलेले भाषण (मराठी तर्जुमा) | १० | ८ | नोव्हें. १८५९ |
| १०) | कर बसविण्याचे सामान्य नियम | १२ | ५ | ऑगस्ट १८६१ |
| ११) | ,, ,, ,, ,, | १२ | ६ | सप्टें. १८६१ |
| १२) | निरनिराळ्या सभा घेण्याचे उद्देश | १२ | ८ | नोव्हें. १८६१ |
| १३) | ब्रिटिश राज्याची रचना | १२ | ९ | डिसें. १८६१ |
| १४) | ,, ,, ,, | १२ | १० | जाने. १८६२ |
| १५) | राजास मसलत देणारे (प्रीव्ही कौन्सल) | १२ | १० | जाने. १८६२ |
| १६) | ब्रिटिश राज्याची रचना | १२ | ११ | फेब्रु. १८६२ |
| १७) | पार्लमेंटसभेमध्ये काम चालण्याचा प्रकार | १२ | १२ | मार्च १८६२ |
| १८) | हिंदुस्थानातील सांप्रतची राज्यव्यवस्था, १८५७ पूर्वीची व राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यानंतरची... | १५ | ११ | नोव्हें. १८६४ |
| १९) | इंग्रजी राज्यात दाद लागण्याचे उपाय | १६ | ३ | मार्च १८६५ |
| २०) | हिंदुस्थानातील काळाविषयी बंदोबस्त | १६ | ५ | मे १८६५ |
| २१) | म्हैसूर व धार (राज्यांच्या वारसाहक्कासंबंधी) | १६ | ६ | जून १८६५ |
| २२) | हिंदुस्थानातील सांप्रतची राज्यव्यवस्था, १८५७ पूर्वीची व राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यानंतरची... | १६ | ६ | जून १८६५ |

### भाषाविषयक

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | एतद्देशीय लोकांस केवळ स्वभाषेच्याच द्वारे विद्या शिकविली असता लाभ कोणकोणते व तीच जर इंग्लिश व स्वभाषा या दोहोंच्या द्वारे शिकविली तर कोणकोणते याचा विचार – राजश्री नारायणभाई | ३ | ९ | डिसेंबर १८५२ |
| २) | ,, ,, ,, | ३ | १० | जाने. १८५३ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ३) | स्वभाषेच्या अभ्यासाची आवश्यकता... | ८ | ३ | जून १८५७ |
| ४) | हिंदुस्थानातील मुख्य मुख्य भाषा, त्यांचे प्रदेश आणि सीमा यांजवर सर एर्स्किन पेरी याने केलेल्या निबंधातील अभिप्राय (सोबत हिंदुस्थानचा भाषा-विभागदर्शक नकाशा) | ८ | ५ | ऑगस्ट १८५७ |
| ५) | गोविंद नारायणांचे भाषण | १४ | ४ | एप्रिल १८६३ |
| ६) | शुद्ध मराठी भाषा आणि मुंबईतील लोकांची अनेक अशुद्ध भाषा | १४ | १० | ऑक्टो. १८६३ |
| ७) | मुंबईतील मराठी भाषा... | १५ | २ | फेब्रु. १८६४ |
| ८) | मोडी लिपीची सुधारणा | १५ | ९ | सेप्टेंबर १८६४ |
| ९) | भरतखंडातील चालू भाषा | १५ | १२ | डिसेंबर १८६४ |
| १०) | एतद्देशीय लोकांस इंग्रेजी शिकण्याची आवश्यकता | १६ | ६ | जून १८६५ |
| ११) | भाषेची आवश्यकता व तिची प्रवृत्ती ह्यांविषयी विचार | १६ | ९ | सप्टेंबर १८६५ |
| १२) | संस्कृत भाषेचे महत्त्व... | १६ | ११ | नोव्हेंबर १८६५ |
| १३) | शब्दशास्त्र व तद्विषयक चमत्कार... (उच्चारप्रक्रिया व ध्वनिशास्त्र ह्यांची प्राथमिक माहिती.) | १७ | ३ | मार्च १८६६ |

### काव्य

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | एक दोहरा (व त्यावरील भाष्य) | ७ | ५ | ऑगस्ट १८५६ |
| २) | भरतखंडाच्या पूर्वीच्या व हल्लीच्या स्थितीवर पद व दुसरी काही नवीन कविता... | १० | ८ | नोव्हें. १८५९ |
| ३) | श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांजवर पोवाडा... | ११ | ४ | जुलै १८६० |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ४) | खर्ड्यांच्या लढाईवर पोवाडा... | १२ | ४ | जुलै १८६१ |
| ५) | सवाई माधवराव यांवरचा पोवाडा... | १२ | ५ | ऑगस्ट १८६१ |
| ६) | कविता – पांडुरंग सखाराम पाटणकर... | १२ | ७ | ऑक्टो. १८६१ |
| ७) | कविता – पांडुरंग सखाराम पाटणकर (फटका) | १२ | ८ | नोव्हें. १८६१ |
| ८) | ज्ञान हेच मुख्य सुख – म. मो. कुंटे (कविताबद्ध निबंध) | १४ | १० | ऑक्टो. १८६३ |
| ९) | ,, ,, | १४ | ११ | नोव्हें. १८६३ |
| १०) | ,, ,, | १५ | १ | जाने. १८६४ |
| ११) | माझे नाव काय ? | १७ | ७ | जुलै १८६६ |

## विनोदी : उपहासात्मक

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | ज्ञानप्रसारक सभेचे पत्रकर्ते यांस – लेखक एक फिरस्ता... | १५ | ३ | मार्च १८६४ |
| | किरकोळ : म्याक्स म्यूलरचे... अ) ऋग्वेदाचे भाषांतर ब) एका महाराजाचा पुतळा— | १५ | ४ | एप्रिल १८६४ |
| २) | ज्ञानप्रसारक सभेचे पत्रकर्ते यांस – लेखक एक फिरस्ता... | १५ | ४ | एप्रिल १८६४ |
| ३) | ,, ,, ,, | १५ | ५ | मे १८६४ |
| ४) | सत्य कोणीकडे आहे ? (चमत्कारिक स्वप्न) | १५ | ६ | जून १८६४ |
| ५) | ज्ञानप्रसारक सभेचे पत्रकर्ते यांस – लेखक एक फिरस्ता... | १५ | ६ | जून १८६४ |

## नाटक

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | विक्रमोर्वशी (भाषांतर) अंक–१ | ४ | १२ | मार्च १८५४ |
| २) | ,, अंक–२ | ५ | १ | एप्रिल १८५४ |
| ३) | ,, अंक–३ | ५ | २ | मे १८५४ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ४) | विक्रमोर्वशी (भाषांतर) अंक–४ | ५ | ३ | जून १८५४ |
| ५) | ,, अंक–४ (पूर्ण) | ५ | ४ | जुलै १८५४ |
| ६) | भाषांतर भास्कर दामोदर पाळंदे–अंक ५ (समाप्त) | ५ | ७ | ऑक्टो. १८५४ |
| ७) | रा. गोविंद नारायण यांनी रचिलेले व्यवहारोपयोगी नाटक–प्रवेश १ ते ५ (मुलांचें लहानपणी लग्न करण्यात व लग्नात बडेजावीने वावगे खर्च करण्यात आमचे लोक किती इच्छुक असतात, व ते साधून घेण्यास कसे तापत्रयात पडतात हे सर्व निरनिराळ्या पात्रद्वारे एथे प्रकट केले आहे)... | ८ | ६ | सप्टेंबर १८५७ |
| ८) | रात्रिभ्रम अंक १ (इंग्रजीवरून अनुवाद) | ९ | ४ | जुलै १८५८ |
| ९) | रात्रिभ्रम | ९ | ५ | ऑगस्ट १८५८ |
| १०) | ,, ,, | १० | १ | एप्रिल १८५९ |
| ११) | ,, ,, | १० | ४ | जुलै १८५९ |
| १२) | ,, ,, | १० | ५ | ऑगस्ट १८५९ |

## संस्कृत शास्त्रीय ग्रंथांची भाषांतरे

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | शास्त्रीय विषयाची प्रस्तावना | ५ | ४ | जुलै १८५४ |
| २) | तर्कसंग्रहाचे भाषांतर | ५ | ४ | जुलै १८५४ |
| ३) | ,, ,, | ५ | ५ | ऑग. १८५४ |
| ४) | ,, ,, | ५ | ६ | सप्टें. १८५४ |
| ५) | ,, ,, | ५ | ७ | ऑक्टो. १८५४ |
| ६) | ,, ,, | ५ | ८ | नोव्हें. १८५४ |

## कादंबरी

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | मिर्झाचे स्वप्न : (पहिले स्वप्न) भाषांतर —ना. वि. बापट | ३ | १२ | फेब्रु. १८५३ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| २) | रासिलास–अध्याय १ ला | ९ | ५ | ऑगस्ट १८५८ |
| ३) | जिपोलीचा किल्ला–अध्याय १ | १० | १ ते ६ | एप्रि. १८५९ ते सप्टें. १८५९ |
| ४) | ,, ,,—अध्याय २ | १० | ७ ते ९ | ऑक्टो. ५९ ते डिसें. १८५९ |
| ५) | ,, ,, | १० | ११ | फेब्रु. १८६० |
| ६) | ,, ,, | १० | १२ | मार्च १८६० |
| ७) | ,, ,, | ११ | १ ते ५ | एप्रि ते ऑग. १८६० |
| ८) | सोनगावचा वृत्तांत— | ११ | ६ | सप्टें. १८६० |
| ९) | ,, ,, | ११ | ७ | ऑक्टो. १८६० |
| १०) | ,, ,, | ११ | ९ | डिसें. १८६० |
| ११ अ) | सोनगावचा वृत्तांत– | ११ | ९ | डिसें. १८६० |
| ११) | जिपोलीचा किल्ला | ११ | ११ | फेब्रु. १८६१ |
| १२) | ,, ,, | ११ | १० | जाने. १८६१ |
| १३) | ,, ,, | ११ | ११ | फेब्रु. १८६१ |
| १४) | ,, ,, | १२ | १ ते ४ | एप्रिल १८६१ ते जुलै १८६१ |
| १५) | ,, ,, | १२ | ६ | सप्टें. १८६१ |
| १६) | ,, ,, | १२ | ८ | नोव्हें. १८६१ |
| १७) | चंद्रहासनामक राजपुत्राचा इतिहास | १५ | २ ते १० | फेब्रु. १८६४ ते ऑक्टो. १८६४ |
| १८) | ,, ,, ,, | १६ | २ | फेब्रु. १८६५ |

## इतिहासविषयक

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| १) | मराठ्यांच्या राज्याचा उत्कर्ष आणि अपकर्ष | १ | ५ | ऑग. १८५० |
| २) | ,, ,, | | ६ | सप्टें. १८५० |
| ३) | ,, ,, | | ८ | नोव्हें. १८५० |
| ४) | ,, ,, | | १२ | मार्च १८५१ |

| क्रमांक | पुस्तकाचे व लेखकांचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ५) | तिरूरीची लढाई | ७ | ८ | नोव्हें. १८५६ |
| ६) | तिरूरीची लढाई | ७ | ९ | डिसें. १८५६ |
| ७) | मुसलमान लोकांचा शककर्ता महंमद मरण पावल्यानंतरचा त्या लोकांचा वृत्तांत... | ८ | ३ | जून १८५७ |
| ८) | ग्रीस देशाचा इतिहास (भाऊशास्त्री पेठकर यांनी इंग्रजीवरून भाषांतर केला तो विद्याखात्याचे मुख्य यांनी या पुस्तकात छापण्यास पाठविला) | ९ | ४ | जुलै १८५८ |
| ९) | ,, ,, | ९ | ५ | ऑग. १८५८ |
| १०) | ग्रीस देशाचा इतिहास– भाऊशास्त्री पेठकर... | १० | १ | एप्रिल १८५९ |
| ११) | ,, ,, | | २ | मे १८५९ |
| १२) | ,, ,, | | ३ | जून १८५९ |
| १३) | ,, ,, | | ४ | जुलै १८५९ |
| १४) | ,, ,, | | ५ | ऑग. १८५९ |
| १५) | ,, ,, | | ६ | सप्टें. १८५९ |
| १६) | मल्हारराव होळकरांविषयी एक गोष्ट | १० | ६ | सप्टें. १८५९ |
| १७) | ग्रीस देशाचा इतिहास– भाऊशास्त्री पेठकर | १० | ७ | ऑक्टो. १८५९ |
| १८) | ,, ,, | १० | ८ | नोव्हें. १८५९ |
| १९) | ,, ,, | १० | ९ | डिसें. १८५९ |
| २०) | ,, ,, | १० | १० | जाने. १८६० |
| २१) | शिवाजीमहाराज यांचा वृत्तांत– विठ्ठल नारायण पेठकर | १० | ११ | फेब्रु. १८६० |
| २२) | ग्रीस देशाचा इतिहास— | १० | ११ | फेब्रु. १८६० |
| २३) | ,, ,, | १० | १२ | मार्च १८६० |
| २४) | शिवाजीमहाराजांचा वृत्तांत | ११ | १ | एप्रिल १८६० |

| *क्रमांक* | *पुस्तकाचे व लेखकाचे नाव* | *पुस्तक* | *अंक* | *काल* |
|---|---|---|---|---|
| २५) | ग्रीस देशाचा इतिहास— | ११ | १ | एप्रिल १८६० |
| २६) | ,, | ११ | २ | मे १८६० |
| २७) | ,, | १२ | ३ | जून १८६० |
| २८) | श्रीमंत सवाई माधवरावसाहेब यांजवर पोवाडा | ११ | ४ | जुलै १८६० |
| २९) | ग्रीस देशाचा इतिहास | ११ | ५ | ऑग. १८६० |
| ३०) | ,, | ११ | ६ | सप्टें. १८६० |
| ३१) | नेपोलियन बोनापार्टची समयसूचकता | ११ | ६ | सप्टें. १८६० |
| ३२) | अहिल्याबाई होळकरीण–भाग १ तिच्या अधिकाराची स्थापना व तिची व्यवस्था– | ११ | १० | जाने. १८६१ |
| २) | ,, भाग २ रा | ११ | ११ | फेब्रु. १८६१ |
| ३५) | ,, भाग ३ रा | १२ | १ | एप्रिल १८६१ |
| ३६) | शिवाजीराजांच्या मृत्यूपासून मराठी राज्याचा वृत्तांतः... | १२ | २, ३ व ४ | जू. जु. १८६१ |
| ३७) | वैदिक काळीचे भरतखंड... | १२ | ४ ते ७ | जु. ते ऑ. १८६१ |
| ३८) | वैदिक काळीचे भरतखंड... | १३ | ६ | सेप्टें. १८६२ |
| ३९) | ठक लोकांचा इतिहास... | १४ | ३ | मार्च १८६३ |
| ४०) | कोल्हापूर संस्थानाचे वर्णन... | १७ | १ | जाने. १८६६ |
| ४१) | ,, ,, | १७ | २ | फेब्रु. १८६६ |
| ४२) | इतिहासपठनापासून लाभ... | १७ | ११ | नोव्हें. १८६६ |
| ४३) | हिंदुधर्माच्या ज्ञानाविषयी अकबराचा प्रयत्न | १७ | ११ | नोव्हें. १८६६ |

## अर्थशास्त्र

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | दक्षिण महाराष्ट्र देशातील शेतकरी लोकांची स्थिती—गणपतराव भास्करजी... | २ | ४ | जुलै १८५१ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| २) | व्यापाराविषयी विचार—हरिश्चंद्र विठोबा | ३ | २ | मे १८५२ |
| ३) | हिंदू लोकांची संपत्ति व तिचे सांप्रत उपयोग याविषयी निबंध—नामदेव नारायणजी प्रभू | ३ | ११ | फेब्रुवारी १८५३ |
| ४) | हिंदुस्थानास दारिद्र्य का प्राप्त झाले ? | ४ | ६ | सप्टेंबर १८५३ |
| ५) | हिंदुस्थानास (अनुत्पादक लोकांचा भरणा) | ४ | ७ | आक्टो. १८५३ |
| ६) | ,, ,, | ४ | ८ | नोव्हें. १८५३ |
| ७) | देशातील संपत्ती वाढविण्याची साधने —भास्कर हरि... | ६ | २ | मे. १८५५ |
| ८) | संपत्तीचे स्वरूप व पदार्थाच्या किंमतीची कारणे—विष्णु घन:श्याम | ६ | ३ | जून १८५५ |
| ९) | हिंदुस्थानची सांप्रतची स्थिती— परशराम योगी... | ६ | ६ | सप्टेंबर १८५५ |
| १०) | संपत्तीच्या उत्पन्नास मदत करणारी कारणे | ६ | १० | जाने. १८५६ |
| ११) | आपल्या देशातील उद्योग पूर्वीपेक्षा वाढला की नाही ? उद्योग मोठ्या प्रमाणे चालत आहे की काय ? व हिंदुस्थानातील लोकांचा उत्कर्ष होण्याचा उपाय—लेखक : विष्णु मोरेश्वर केळकर. | ६ | १० | फेब्रुवारी १८५६ |
| १२) | व्यापार प्रकरण... ? | ६ | ११ | फेब्रुवारी १८५६ |
| १३) | संपत्तीच्या उत्पन्नास मदत करणारी कारणे | ६ | ११ | फेब्रुवारी १८५६ |
| १४) | व्यापार प्रकरण...२ | ६ | १२ | मार्च १८५६ |
| १५) | व्यापाराचा इतिहास... | ७ | १, २ | एप्रिल, मे १८५६ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| १६) | क्रियेवाचून ज्ञान पंगू आहे. या विषयी धोंडु आणि रामचंद्र यांचा संवाद—केशव जनार्दन प्रभु पुनाळेकर | ७ | ९ | (एतद्देशियांची आर्थिक स्थिति) डिसेंबर १८५६ |
| १७) | कर | १० | ५ | ऑगस्ट १८५९ |
| १८) | कर्जाविषयी साधारण विचार... | १४ | ६ | जून १८६३ |
| १९) | अमेरिकेतील लढाई व कापसाची महागाई | १४ | ७ | जुलै १८६३ |
| २०) | या जगात संपतीचा खेळ | १४ | ८ | ऑगस्ट १८६३ |
| २१) | संपत्ती म्हणजे काय? बाळा मंगेश वागळे, बी. ए. | १५ | १० | ऑक्टोबर १८६४ |
| २२) | दुहेरी नाणे...भास्कर हरी भागवात. | १५ | ११ | नोव्हेंबर १८६४ |
| २३) | सन १८६४ इसवी सालचा संक्षिप्त इतिहास—(आर्थिक व राजकीय घडामोडींचा आढावा) | १६ | १ | जानेवारी १८६५ |

## अर्थ–शास्त्र

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २४) | व्यापार आणि चाकरी | १६ | ३ | मार्च १८६५ |
| २५) | संपत्तीपासून भय | १६ | ३ | मार्च १८६५ |
| २६) | अमेरिकेतील लढाई व मुंबईचा व्यापार. | १६ | ७ | जुलै १८६५ |

## विद्या, शिक्षण इत्यादीसंबंधी

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | विद्येचा लाभ–दादोबा पांडुरंग | १ | १० | ऑक्टो. १८६६ |
| २) | विद्येविषयी निबंध–बाबाजी कृष्णनाथजी | १ | ३ | जून १८५० |
| ३) | विद्योद्भव लाभ—जनार्दन हरी आठल्ये दोन लेखांक. | १ | ९<br>१० | डिसें. व जाने.<br>१८५०, ५१ |
| ४) | ज्ञानापासून मनुष्याचे स्थितीवर झालेले परिणाम | १ | १० | जाने. १८५१ |
| ५) | ज्ञानापासून मनुष्याचे स्थितीवर झालेले परिणाम | १ | ११ | फेब्रु. १८५१ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ६) | शिक्षालाभ—हरि केशवजी | २ | १ | एप्रिल १८५१ |
| ७) | स्त्रीशिक्षणाविषयी विचार | २ | २ | मे १८५१ |
| ८) | स्त्रियांस विद्याभ्यासाची आवश्यकता आहे याविषयी निबंध | २ | १० | जाने. १८५२ |
| ९) | स्त्रीशिक्षणाविषयी निबंध–तद्विषयक उपोद्घातरूप विचार : शुक्लपक्ष व कृष्णपक्ष ह्यांतील वाद. (तीन लेखांक) | ३ | २ ते ५ | मे ते ऑगस्ट १८५२ |
| १०) | स्वदेशात विद्या कोणत्या रीतीने वाढेल व तीस अडथळे कोणते येतात या विषयी साधारण विचार. | ४ | १ | एप्रिल १८५३ |
| ११) | विद्योद्भवानंद | ४ | ४ | जुलै १८५३ |
| १२) | विद्याभिमान | ४ | ४ | जुलै १८५३ |
| १३) | विद्वान लोकांविषयी साधारण विचार. | ४ | ४ | जुलै १८५३ |
| १४) | गणितशास्त्राच्या अभ्यासापासून लाभ. | ४ | ५ | ऑगस्ट १८५३ |
| १५) | मुलांना लहानपणापासून नीती इत्यादिक शिकविण्याविषयी. | ४ | ५ | ऑगस्ट १८५३ |
| १६) | शक्तीबाहेर अभ्यास करू नये याविषयी साधारण विचार. | ४ | ११ | फेब्रुवारी १८५४ |
| १७) | विद्यावृद्धीविषयी विचार (लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री) | ५ | १२ | मार्च १८५५ |
| १८) | ज्ञानप्रसार : चातुर्य (दोन लेखांक) | ६ | १,२ | ए. मे, १८५५ |
| १९) | मुलांच्या शिक्षणपद्धतीवर काही विचार. | ६ | ३ | जून १८५५ |
| २०) | शास्त्रीय विषयांच्या अभ्यासापासून लाभ—(वासुदेव जगन्नाथ) | ७ | ३,४ | जून,जुलै १८५६ |
| २१) | हिंदुस्थानात विद्येचा प्रसार | ८ | ४ | जुलै १८५७ |
| २२) | शाळांविषयी विचार–नारो मल्हार (स्कूलमास्तर) | ८ | ७ | ऑक्टो. १८५७ |
| २३) | शिकविण्याच्या रीतीवर काही विचार. | १० | ४ | जुलै १८५९ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| २४) | अवलोकन हा एक ज्ञानसंपादनाचा मार्ग (शांताराम नारायण) | १० | ६ | सप्टें. १८५९ |
| २५) | हिंदुस्थानातील प्राचीन विद्या (एक स्वप्न) विनायक जनार्दन कीर्तने. ७ लेखांक | १०<br>११<br>११ | १०,११,१२<br>१<br>४,५,६, | -१८६०<br>१८६०<br>१८६० |
| २६) | एतद्देशीय लोकांच्या मुलांस विद्याभ्यास करण्याकरिता इंग्लंडांत पाठविण्याविषयी मिस्तर हद्स्नप्रात याची योजना. | १२ | ३ | जून १८६१ |
| २७) | मराठी बडेलोकांचे शिक्षण. | १२ | ७ | ऑक्टो. १८६१ |
| २८) | आत्मशिक्षण (तीन लेखांक) | १३,१४ | ८,९<br>१ | नो.डि. १८६२<br>जाने. १८६३. |
| २९) | विद्याव्यसन हेच अलौकिक सुखास कारण होय. | १५ | ५ | मे १८६४ |
| ३०) | युरोपियन (युरोपद्वीपोत्पन्न) व एतद्देशीय शास्त्रांची तुलना. | १५ | ५ | मे १८६४ |
| ३१) | पुस्तकी विद्या. | १५ | ६ | जून १८६४ |
| ३२) | स्त्री-शिक्षण. | १५ | ७ | जुलै १८६४ |
| ३३) | युनिव्हर्सिटी. | १६ | ५ | मे १८६५ |
| ३४) | ज्ञानप्राप्तीच्या मार्गात येणारे स्वाभाविक व औपाधिक अडथळे. | १७ | १० | ऑक्टो. १८६६ |

## सामान्य विज्ञान

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | मेणवत्त्या तयार करण्याची रीत... | २ | ७ | ऑक्टो. १८५१ |
| २) | काचेवर अक्षरे इत्यादी उठविणे. | २ | ८ | नोव्हें: १८५१ |
| ३) | हिंगुळ | २ | ९ | डिसें. १८५१ |
| ४) | गारेची काच... | २ | ९ | डिसें. १८५१ |
| ५) | टाचण्यांचे कारखाने. | २ | १० | जाने. १८५२ |
| ६) | विद्युल्लतेचे व्यवहारात उपयोग (विद्युद्द्वारा मुलामा देण्याची कृति.) | २ | १२ | मार्च १८५२ |

| क्रमांक | पुस्तकाचे नांव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ७) | कागद करण्याची रीत (विनायकराव हरिश्चंद्रजी) | ३ | ८ | नोव्हें : १८५२ |
| ८) | लोखंडी रस्त्याचे हिंदुस्थानामध्ये अगत्य याविषयी निबंध : | ३ | ८ | नोव्हें : १८५२ |
| ९) | नौकावृत्तांत (काशीनाथ विठोबा) | ३ | ११ | फेब्रु : १८५३ |
| १०) | मेसमेरिझम म्हणजे प्राणाकर्षणशक्ती यावर निबंध (विश्वनाथ कृष्णनाथजी) | ४ | १ | एप्रिल १८५३ |
| ११) | जादू | ४ | ४ | जुलै १८५३ |
| १२) | धातूंच्या खाणी : सोने, रुपे... | ४ | ७ | ऑक्टो : १८५३ |
| १३) | कृत्रिम व अकृत्रिम पदर्थांतील भेदाविषयीं विचार : | ४ | ६ | सप्टें. १८५३ |
| १४) | हिरे... | ४ | ९ | डिसें. १८५३ |
| १५) | पारा. | ४ | १० | जाने. १८५४ |
| १६) | कापसाच्या वस्त्राविषयीं प्राचीन वर्णन. | ४ | १० | जाने. १८५४ |
| १७) | ठसेछापाची शाई. | ५ | ६ | सप्टें. १८५४ |
| १८) | संगमरवरी वगैरे दगड जडविण्याचे लुकण. | ५ | ७ | ऑक्टो : १८५४ |
| १९) | तांबड्या वगैरे रंगाची छापण्याची शाई. | ५ | ८ | नोव्हें. १८५४ |
| २०) | शिलाछापाची शाई... | ५ | ८ | ,, ,, |
| २१) | कागद रंगविण्याविषयी. | ६ | १ | एप्रिल १८५५ |
| २२) | ग्रहण पाहण्याची रीत... | ६ | ६ | सेप्टें. १८५५ |
| २३) | रबरासंबंधी... | ६ | १० | जाने. १८५६ |
| २४) | सृष्टींतील दर्शनचमत्कार...(हरिशंकर बाळकृष्ण) | ६ | १२ | मार्च १८५६ |
| २५) | सृष्टिदर्शन चमत्कार... | ७ | १ | एप्रिल १८५६ |
| २६) | सृष्टिदर्शन चमत्कार... | ७ | २ | मे १८५६ |
| २७) | कालमान यंत्रे. (छाया यंत्र–रेतीचे घड्याळ–पाण्याने चालणारे कालमान यंत्र) | ८ | ४ | जुलै १८५७ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| २८) | मृगजल | १० | ३ | जून १८५९ |
| २९) | निद्राभ्रमण... | १२ | ५ | ऑगस्ट १८६१ |
| ३०) | मोत्यांचे शिंप (सचित्र) | १३ | ६ | सेप्टें; १८६२ |
| ३१) | शेंडेनक्षत्र म्हणजे धूमकेतू | १४ | १ | जाने. १८६३ |
| ३२) | कापूस. | १४ | ६ | जून १८६३ |
| ३३) | नूतन शास्त्रीय शोध (पृथ्वीवर चंद्राचा व्यापार, भरती ओहटी वगैरे) | १५ | १० | ऑक्टो. १८६४ |
| ३४) | पर्जन्यकाळाचे आकाशातील चमत्कार (संवादात्मक) | १७ | ६ | जून १८६६ |

## समाजशास्त्र

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| १) | हिंदुस्थानची प्राचीन स्थिती, सांप्रतची स्थिती आणि या देशाचा पुढे होणारा परिणाम—(सखाराम दीक्षित मनोहर) | १ | ४ | जुलै १८५० |
| २) | हिंदु लोकांच्या स्थितीविषयी निबंध (बाळ भास्कर) | १ | ९ | डिसें. १८५० |
| ३) | ज्ञान व उद्योग यांचा हिंदूंचे स्थितीशी संबंध : | २ | २ | मे १८५१ |
| ४) | गुजराथीआणि मराठी लोकांचे सांप्रतच्या स्थितीची तुलना...(केशव जनार्दन पुनाळेकर) | २ | ३ | जून १८५१ |
| ५) | हिंदु लोकांच्या चाली : | ४ | ३ | जून १८५३ |
| ६) | स्त्रियांस वागविण्याची पद्धती. | ४ | ९ | डिसें. १८५३ |
| ७) | एतद्देशीय स्त्रियांची स्थिती (नारायण रघुनाथ) | ६ | ५ | ऑग. १८५५ |
| ८) | चीन देशातील स्त्रियांची स्थिती | १० | २ | मे १८५९ |
| ९) | हिंदु स्त्रियांचे पुरातन हक्क (राममोहनराय यांच्या निबंधाचा गोषवारा) | १० | ३ | जून १८५९ |
| १०) | अंदमान बेटात देशपार केलेला शिपाई. | १० | ९ | डिसें. १८५९ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ११) | चाकराच्या कृत्याबद्दल धन्याची जबाबदारी. | १२ | ७ | ऑक्टो. १८६१ |
| १२) | सोहळा... | १२ | ११ | फेब्रु. १८६२ |
| १३) | आमच्या मध्यंतरीय अवस्थेविषयी विचार... | १२ | १२ | मार्च १८६२ |
| १४) | हिंदू वगैरे लोकांच्या लग्नसमारंभाविषयी (नारोपंत आणि राघोपंत यांचा संवाद) | १२ | १२ | मार्च १८६२ |
| १५) | हिंदू वगैरे लोकांच्या लग्नसमारंभाविषयी (संवादात्मक) | १३ | १ | एप्रिल १८६२ |
| १६) | चमत्कारिक नवसांची चाल. | १४ | २ | फेब्रु. १८६३ |
| १७) | चिनी लोकांचा लग्नव्यवहार : | १४ | ३ | मार्च १८६३ |
| १८) | हिंदूंचे वैगुण्य (संवादात्मक) | १४ | ७ | जुलै १८६३ |
| १९) | स्त्रीपुरुषांचे विवाहाचे वय काय असावे... | १४ | ९ | सेप्टें. १८६३ |
| २०) | हिंदू लोकांचा मध्यंतरीय अवस्थेविषयी विचार—(उत्तरार्ध) रा. सा. वि. ना. मंडलीक : | १४ | ११ | नोव्हें. १८६३ |
| २१) | मराठी कारकून लोक. | १५ | १२ | डिसें. १८६४ |
| २२) | प्रजावृद्धी व तिजपासून होणारे परिणाम (म. गो. रानडे) | १६ | १ | जाने. १८६५ |
| २३) | मनुष्य, त्याचे स्थित्यंतर व तदनुरूप त्याचे धर्म. | १६ | २ | फेब्रु. १८६५ |
| २४) | जैन लोकांचा वृत्तांत : | १६ | ३ | मार्च १८६५ |
| २५) | जैन लोकांचा वृत्तांत : | १६ | ४ | एप्रिल १८६५ |
| २६) | आफ्रिकेतील व अमेरिकेतील गुलामांचे व्यापाराविषयी— | १६ | ८ | ऑग. १८६५ |
| २७) | हिंदुस्थानातील कितीएक अविचाराच्या चाली व त्यापासून देशसुधारणेस होणारे अडथळे ह्याविषयी... | १६ | ९ | सेप्टें. १८६५ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| २८) | महाराष्ट्रदेशीय लोकांच्या भिन्न भिन्न जातींविषयी... | १६ | ९ | सेप्टें. १८६५ |
| २९) | एतद्देशीय लोकांच्या गुणदोषांचे विवेचन | १७ | ४ | एप्रिल १८६६ |
| ३०) | गुजराथी लोक आणि मराठे लोक यांची तुलना : | १७ | ५ | मे १८६६ |

## आरोग्य–विज्ञान : शरीर-शास्त्र

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | कैफ व त्यापासून परिणाम... | ४ | १२ | जून १८५३ |
| २) | बालकाचे पालन. | ४ | ३ | जून १८५३ |
| ३) | दारूविषयी निबंध. | ४ | ५ | ऑगस्ट १८५३ |
| ४) | मरगीचा वायू (सामील असे या वायूस म्हणतात) | ४ | ६ | सप्टें. १८५३ |
| ५) | नेत्र...विष्णू घनःश्याम... | ४ | ८ | नोव्हेंबर १८५३ |
| ६) | जिव्हा...विष्णू घनःश्याम... | ४ | ९ | डिसेंबर १८५३ |
| ७) | अशिक्षित वैद्य यांविषयी... | ५ | १ | एप्रिल १८५४ |
| ८) | देवी या रोगाचा संक्षिप्त वृत्तांत व तो बंद होण्याचे उपाय... | ६ | ३ | जून १८५५ |
| ९) | रोग व इतर प्राणघातक अरिष्टे बंद करण्यात ज्ञानाचा उपयोग—सदानंद बालकृष्ण... | ६ | ९ | डिसेंबर १८५५ |
| १०) | ,, ,, | ६ | १२ | मार्च १८५६ |
| ११) | रोग व इतर प्राणघातक अरिष्टे बंद करण्यात ज्ञानाचा उपयोग... | ७ | ४ | जुलै १८५६ |
| १२) | ,, ,, | ७ | ७ | ऑक्टोबर १८५६ |
| १३) | अन्न—गोविंद नारायण... | ८ | ५ | आगस्ट १८५७ |
| १४) | ,, ,, | ८ | ७ | ऑक्टोबर १८५७ |
| १५) | शरीरसंबंधी अनियमितपणा—महादेव मोरेश्वर. | ९ | ३ | जून १८५८ |
| १६) | ,, ,, | ९ | ४ | जुलै १८५८ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| १७) | त्वचा, तिचे व्यापार आणि त्याविषयी काही सूचना... | ९ | ५ | ऑगस्ट १८५८ |
| १८) | शरीरसंबंधी नियमितपणा—उदर, त्याचे व्यापार, अजीर्ण व त्यापासून अनर्थ—महादेव मोरेश्वर. | १० | १ | एप्रिल १८५९ |
| १९) | शरीरसंबंधी नियमितपणा—महादेव मोरेश्वर. | १० | २ | मे १८५९ |
| २०) | अफू व तिजपासून अनर्थ... | १० | २ | मे १८५९ |
| २१) | शरीरविषयी नियमितपणा—व्यभिचार न करण्याचा उपदेश... | १० | २ | मे १८५९ |
| २२) | मनुष्याचे शरीराचा आकार व लक्षणे कृतीने कसकशी बदलली आहेत याविषयी—विनायक नारायण भागवत. | १० | ९ | डिसेंबर १८५९ |
| २३) | वैद्यकीय सल्ला... | १० | ९ | डिसेंबर १८५९ |
| २४) | शरीरसंपत्तीची आवश्यकता, तिची प्राप्ती आणि तिजपासून लाभ—विठ्ठल नारायण. | १० | १० | जानेवारी १८६० |
| २५) | शरीरसंपत्ती, तिचे संरक्षण आणि तिजपासून लाभ... | १० | ११ | फेब्रुवारी १८६० |
| २६) | ,, ,, | १० | १२ | मार्च १८६० |
| २७) | शिंक... | ११ | १२ | मार्च १८६१ |
| २८) | दात स्वच्छ कसे ठेवावे ? केस स्वच्छ व मजबूत कसे ठेवावे ? ढेकणावर औषध... | १२ | १ | एप्रिल १८६१ |
| २९) | निर्मळपणा... | १२ | ६ | सेप्टेंबर १८६१ |
| ३०) | अचाट खाणे मसणात जाणे—गोविंद ना. माडगांवकर. | १२ | ९ | डिसेंबर १८६१ |
| ३१) | महामारी... | १४ | ९ | सेप्टेंबर १८६३ |
| ३२) | संजीवनी विद्या... | १५ | ८ | ऑगस्ट १८६४ |
| ३३) | मनुष्याच्या जीवनास स्वच्छ हवेची आवश्यकता व ती राखण्याचे उपाय... | १६ | १२ | डिसेंबर १८६५ |

## चरित्रात्मक

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| १) | बेंजामिन फ्रांक्लिनचा वृत्तान्त. | २ | ३ | जून १८५१ |
| २) | सर विल्यम हर्शेल. | २ | ५ | ऑगस्ट १८५१ |
| ३) | सर हम्फ्री डेवी यांचा वृत्तांत. | २ | ९ | डिसेंबर १८५१ |
| ४) | सर ऐझाक न्यूटन याचे चरित्र, जॉन हवार्ड याचे चरित्र, विष्णू घनःश्यामः | ४ | २ | मे १८५३ |
| ५) | ग्रीस देशातील सप्तज्ञानी-विष्णू घनःश्याम | ५ | २ | मे १८५४ |
| ६) | ग्रीस देशातील सप्तज्ञानी | ५ | ६ | सेप्टें. १८५४ |
| ७) | ग्रीस देशातील पिटेकस. | ६ | २ | मे १८५५ |
| ८) | ग्रीस देशातील बैयस. | ६ | ५ | आगस्ट १८५५ |
| ९) | मुसलमानधर्म प्रवृत्त करणारा महमद याचा वृत्तान्त. | ७ | ४ | जुलै १८५६ |
| १०) | ,, ,, | ७ | ५ | ऑगस्ट १८५६ |
| ११) | नूरजहानराणी. | ८ | ४ | जुलै १८५७ |
| १२) | लार्ड क्लैव याचा वृत्तान्त. | ८ | ४ | जुलै १८५७ |
| १३) | राजा राम मोहन राय यांचें चरित्र. | ८ | ९ | डिसेंबर १८५७ |
| १४) | ,, ,, | ८ | १० ते १ | जाने. १८५८ ते एप्रिल १८५८ |
| १५) | सर जमशेटजी जीजीभाई बारोनेट (मृत्युलेख) | १० | २ | मे १८५९ |
| १६) | शिवाजीमहाराज यांचा वृत्तान्त : विठ्ठल नारायण पाटकर. | १० | ११ | फेब्रु. १८६० |
| १७) | ,, ,, | १० | १२ | मार्च १८६० |
| १८) | ,, ,, | ११ | १ | एप्रिल १८६० |
| १९) | एका रुपयाचे चरित्र (आत्मचरित्रात्मक) | ११ | ३ | जून १८६० |
| २०) | मद्रासचा गव्हर्नर सर चार्ल्स विवेल्यन | ११ | ३ | जून १८६० |
| २१) | ग्यालिलो याचा वृत्तान्त | ११ | ९ | डिसें. १८६० |

| क्रमांक | पुस्तकाचे नांव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| २२) | प्रिन्स आल्बर्ट याचे मरण (मृत्युलेख) | १२ | ११ | फेब्रु. १८६२ |
| २३) | प्रिन्सिपाल जॉन हार्कनेस (एल्फिन्स्टन कॉलेजचा पहिला प्रिन्सिपाल यास विद्यार्थ्यांचे मानपत्र, तर्जुमा) | १३ | ३ | जून १८६२ |
| २४) | ,, ,, | १३ | ४ | जुलै १८६२ |
| २५) | बौद्ध धर्माचा स्थापक बुद्ध याचा संक्षिप्त इतिहास (हा वृत्तान्त ललितविस्तार म्हणून बुद्धांचा जो प्रख्यात ग्रंथ त्यांतून संक्षिप्त रीतीने एका फ्रेंच ग्रंथकाराने काढून घेतला त्याचा सारांश आहे.) | १३ | ८ | नोव्हें. १८६२ |
| २६) | सर विलियम जोन्स, याचा संक्षिप्त इतिहास. | १४ | ४ | एप्रिल १८६३ |
| २७) | शेट फ्रामजी कावसजी बनाजी (१८५६ च्या ज्ञानप्रसारक पुस्तकावरून आणि पारशांचा इतिहाससंबंधीं शेट डोसाभाई कराकांनीं रचलेल्या इंग्रजी पुस्तकावरून आमच्या वाचणाऱ्यासाठीं, निबंध तयार केला. | १४ | ५ | मे १८६३ |
| २८) | ,, ,, | १४ | ६ | जून १८६३ |
| २९) | रूस देशांची, कीर्तिमान सार्वभौमी क्याथरिना इचा वृत्तांत. | १४ | ९ | सेप्टें. १८६३ |
| ३०) | निकोलस सांडर्सन याचा संक्षिप्त इतिहास | १४ | १० | ऑक्टो. १८६३ |
| ३१) | नामदार मौंट स्टुअर्ट एलफिन्स्टन साहेबांचे चरित्र. | १४ | ११ | नोव्हें. १८६३ |
| ३२) | आनरेबल जगन्नाथ शंकरशेट यांची हकीकत (मृत्युलेख) | १६ | ८ | ऑगस्ट १८६५ |
| ३३) | नाना फडणवीसाचा वृत्तांत (याप्रमाणे वर्तमान-राजेश्री कृष्णाजी भास्कर ओप्ये यांणी सांगितले-असा शेवट) | १६ | ८ | ऑगस्ट १८६५ |

| क्रमांक | पुस्तकाचे नाव | पुस्तक | अंक | काल |
|---|---|---|---|---|
| ३४) | सर विल्यम हर्शल. | १६ | ९ | सेप्टें. १८६५ |
| ३५) | सर वाल्टर स्काट. | १७ | ९ | सेप्टें. १८६५ |

## गोष्टी, कथा इत्यादी

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | लोभ आणि विलास याविषयी रूपक— नारायण विष्णु बापट : | १ | १२ | मार्च १८५१ |
| २) | नीतिमार्गप्रदर्शक कथा. | ३ | १ | एप्रिल १८५२ |
| ३) | ,, ,, | २ | २ | मे १८५२ |
| ४) | सोडत इत्यादी द्यूतनिवेद्यपर कथा— राजेश्री विश्वनाथ नारायण. | ३ | ६ | सेप्टेंबर १८५२ |
| ५) | ,, ,, | ३ | ७ | ऑक्टोबर १८५२ |
| ६) | संपदा आणि आपदा यांविषयी रूपक. | ३ | ११ | फेब्रुवारी १८५३ |
| ७) | सद्गुण आणि विषयानंद याविषयी रूपक ते असे की, सगुणा आणि आनंदी दोन्ही स्त्रिया बलदेवाचा स्तव करिताहेत (भाषांतर–ना. वि. बापट) | ३ | ११ | फेब्रुवारी १८५३ |
| ८) | मनुष्याच्या स्थितीची तसवीर. | ५ | १ | एप्रिल १८५४ |
| ९) | ,, ,, | ५ | २ | मे १८५४ |
| १०) | उपदेशपर कथा. | ५ | ८ ते ११ | नोव्हें. १८५४ ते फेब्रुवारी १८५५ |
| ११) | एका फकिराची गोष्ट | ८ | ३ | जून १८५७ |
| १२) | मातृभक्तीचे उदाहरण बसरवेलि व त्याचे चाकर (आख्यायिकांच्या स्वरूपाच्या कथा) | ८ | ५ | ऑगस्ट १८५७ |
| १३) | सद्गुण आणि ख्यालिखुशाली यांवर रूपक (हे रूपक मूळचे ग्रीक भाषेत साक्रेटीस या प्रख्यात ज्ञानी पुरुषाने लिहिले होते ते आडिसन याणे इंग्रजीत केले आणि इंग्रजीवरून ते आम्ही येथे घेतले आहे.) | ८ | ९ | डिसेंबर १८५७ |

परंतु मराठी साहित्यविचाराला नवे वळण लावण्याच्या बाबतीत 'मराठी ज्ञानप्रसारका'ने केलेले कार्य केवळ ग्रंथपरीक्षणांपुरते मर्यादित नाही. तें कार्य त्याने इतर अनेक लेखांमार्फतही केले आहे. हे सर्वच लेख वाङ्मयविचाराच्या दृष्टीने सारख्याच महत्त्वाचे आहेत असे नाही. त्यातील काही अगदीच प्राथमिक स्वरूपाचे आहेत; परंतु काहीतून महत्त्वाच्या वाङ्मयविषयक प्रश्नांचा बराचसा स्वतंत्रपणे विचार झाला आहे. ग्रंथपरीक्षणांखेरीज ज्या लेखांचा साहित्यविचाराशी संबंध पोचतो असे 'मराठी ज्ञानप्रसारका'तून प्रसिद्ध झालेले लेख पुढीलप्रमाणे होतः

| | |
|---|---|
| १. चित्राविषयी विचार | पुस्तक ४, अं. ४, जुलै १८५३ |
| २. पद्यरचना | पुस्तक ४, अं. १२ मार्च १८५४ |
| (दोन लेखांक) | ,, ५, ,, ११ फेब्रु. १८५५ |
| ३. कविता म्हणजे काय ? | पुस्तक ५ अंक १ एप्रिल १८५४ |
| ४. चित्रांची व्यावहारिक उपयुक्तता | पुस्तक ५ अं. १२ मार्च १८५५ |
| ५. गोविंद नारायण यांचें भाषण | १८ डिसेंबर १८५७ |
| ६. वाचन (दोन लेखांक) | पु० ९ अंक २ मे १८५८ |
| | पु० ९ अंक ३ जून १८५८ |
| ७. ग्रीस देशांतील कवींचा व त्यांच्या काव्याचा परिचय | पु० १० अं. ७ ऑक्टोबर १८५९ |
| ८. भाषांतर | पु० १० अं. ९ डिसेंबर १८५९ |
| ९. हिंदुस्थानांतील प्राचीन विद्या : वि० ज० कीर्तने | पु० ११ अं. ६ सप्टेंबर १८६० |
| १०. मराठी कवी आणि कविता. (वि० ना० पा०) | पु० १२ अं. ८ नोव्हेंबर १८६१ |
| ११. निबंध लिहिणे | पु० १२ अं. १० जाने. १८६२ |
| १२. लिहिण्याची शैली. ज० स० गाडगीळ | पु० १४ अं. ४ एप्रिल १८६३ |
| १३. चंद्रहासनामक राजपुत्राचा इतिहास (कवी आणि कवित्व ह्यासंबंधी विवेचन) | पु० १५ अं. फेब्रुवारी १८६४ |
| १४. मानभावी पंथ | पु० १७ अं. ८ ऑगस्ट १८६६ |
| १५. सर वॉल्टर स्कॉट | पु० १७ अं. ९ सेप्टेंबर १८६६ |

वाङ्मयविचाराच्या दृष्टीने वरील यादीतील कालदृष्ट्या महत्त्वाचा ठरणारा पहिला लेख म्हणजे 'कविता म्हणजे काय ?' हा होय. हा लेख 'ज्ञानप्रसारका'च्या एप्रिल १८५४ च्या अंकात प्रसिद्ध झाला असून तो केवळ दोन पानांचा टिपणवजा आहे. त्यात एकच मुद्दा परंतु जरा विस्ताराने मांडला आहे: तो म्हणजे 'प्रासबद्ध पद्यरचनेचे नाव कविता' हा जो 'प्राकृत भाषेतील' कविता वाचून अनेकांचा ग्रह झालेला आहे तो निराधार व 'अयोग्य' आहे; कारण लेखकाच्या मते 'प्रासादीं'च्या ठिकाणी एक प्रकारचे निर्जीवत्व आहे.' 'त्यांच्या ठिकाणी मनास आकर्षण करून घेण्यास अगदी सामर्थ्य नाही.' कालिदासादींच्या ग्रंथांत 'जुन्यास नवे करणे, नीरसास सरस करणे, निर्जीवास सजीव करणे; मनास क्षणात चिंतासमुद्रात ढकलणे, क्षणात रंजविणे; क्षणात राग, क्षणात ममता, क्षणात द्वेष, क्षणात साधुपणा याप्रमाणे उत्पन्न करणे; पृथ्वीवरील लोकांस न कळत स्वर्गलोकी नेणे अथवा स्वर्गवासीयांस मनुष्यांमध्ये आणून टाकणे; सारांश, ज्याचा (ज्याचा) अभाव त्याची केवळ ईश्वराप्रमाणे सृष्टी करणे अशी (जी) अद्भुत शक्ती आहे' ती लेखकाच्या मते त्यात ते प्रासबद्ध असल्याने आलेली नाही. त्यात अवतरलेले हे सामर्थ्य पद्याचे नाही तर 'हे सामर्थ्य अर्थाचे आहे.' कवितेतून व्यक्त होणारा व ज्यामुळे कवितेत सामर्थ्य अवतरते असा अर्थ कोणता तर 'आपल्याशी बोलणार, आपल्यास उपदेश करणार, आपल्या मनात नाना तऱ्हेचे विकार उत्पन्न करणार, आपल्यास ह्या सृष्टीखेरीज शतावधी सुंदर सृष्टी दाखविणार व या सृष्टीतही अनंत रूपांनी चमत्कार दाखवून आपल्यास या संसारातील अनेक दुःखे असता तृप्त व आनंदभरित ठेवणार असा अर्थ' हे लेखक पुढे बजावतो. कवितेत केवळ प्रासाला, पद्यात्मक रचनेला महत्त्व नाही हे स्पष्ट करिताना लेखक शेवटी म्हणतो, 'अक्षरांचे सौभाग्य अर्थाच्या जिवावर, अर्थाचा नाश झाला अथवा त्यात काही व्यंग झाले तर त्या अक्षरांचा काही उपयोग नाही.' असे हे सदर टिपण छोटेसेच असले व त्यात एकाच मुद्द्याचा विस्तार असला तरी त्यातून कवितेच्या ज्या अंगांकडे लेखकाने लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला आहे ती अंगे किती महत्त्वाची आहेत हे सांगण्याची आवश्यकता नसावी. ह्यानंतर आणखी दहापंधरा वर्षांनी श्री. कुंटे यांनी आपल्या 'राजा शिवाजी'च्या प्रस्तावनेने आणि आणखी तीस-चाळीस वर्षांनी केशवसुतांनी आपल्या प्रत्यक्ष काव्य-लेखनाने कवितेच्या प्रकृतीच्या संबंधात ज्या नव्या जाणिवा निर्माण केल्या

त्यांचे सूतोवाच वरील टिपणांसारख्या लेखनातून होते असे दिसून येते. कवितेकडे पाहण्याची पारंपारिक दृष्टी कशी बदलत होती ह्याचे हे छोटेसे टिपण निश्चित निदर्शक आहे.

ह्यानंतर 'ज्ञानप्रसारका'तील ज्या वाङ्मयविषयक निबंधाकडे आपले लक्ष जाते तो निबंध म्हणजे विनायक जनार्दन कीर्तने यांचा 'वाचन' हा निबंध-कीर्तने यांनी वयाच्या १८ व्या वर्षी म्हणजे त्यांची 'थोरले माधवराव पेशवे' व 'जयपाळ' ही दोन्ही नाटके लिहिली जाण्यापूर्वी लिहिलेला हा निबंध आहे. तो 'ज्ञानप्रसारका'च्या मे व जून १८५८ च्या अंकांतून प्रसिद्ध झाला आहे. ह्या निबंधात कीर्तने यांचा रोख कादंबऱ्यांच्या वाचनाविरुद्ध आहे. कीर्तने यांच्या डोळ्यांसमोर ज्या तत्कालीन कादंबऱ्या आहेत त्यासंबंधी त्यांना असे म्हणावयाचे आहे की, "त्यांच्या वाचनानें व्यर्थ कल्पना मात्र फाकतात. मनात मात्र वाटतें की, जसा कांहीं मी रंभेसहवर्तमान सातखणी माडीवर उंच छप्परपलंगावर पानसुपारी खात विनोदाची भाषणें करीत बसलों आहें. यापासून वेळाची व नीतीची हानी एवढाच काय तो लाभ. हीं पुस्तकें इतुक्या चतुराईनें रचिलेलीं असतात कीं, एक पृष्ठ वाचिलें म्हणजे दुसरें वाचावेसें वाटतें, मग तिसरें आणि चवथें. सारांश, स्त्रियांच्या व तशाच दुसऱ्या गोष्टी तिखट-मीठ लावून रसभरित करून लिहिलेल्या असतात, त्यामुळें वाचणारांस पृष्ठोपृष्ठीं अधिकाअधिक गोडी लागून तें पुस्तकच टाकावेंसें वाटत नाही. मग तो तेंच वाचीत बसतो, तेव्हां अर्थातच इतर जी अधिक उपयोगी कृत्यें त्यांजकडे दुर्लक्ष होऊन सर्व कामाची नासाडी होते." तरुण कीर्तन्यांचा रोख कोणत्या प्रकारच्या कादंबऱ्यांच्या विरुद्ध आहे हे वरील उताऱ्यावरून लक्षात येण्यासारखे आहे. ते ह्या निबंधात पुढे एके ठिकाणी म्हणतात, "मित्रहो, उपाख्यानादी आणखी अनेक दुसरे ग्रंथ असतात, ज्यास इंग्रेजीत novels अशी संज्ञा आहे. हे ग्रंथ बहुधा अतिशय घाणेरडे असतात. यांत बऱ्याच चावट व पांचट गोष्टी असतात. त्या वाचल्यानें तरुण लोक नीतिभ्रष्ट होत्साते नाना प्रकारचीं कुकर्में करण्यास प्रवृत्त होतात. या पुस्तकांमध्यें कित्येक चांगलीं असतात हें खरें आहे, परंतु १०० अथवा १००० त एक. तशीं जीं चांगलीं असतील तीं वाचण्यास अनमान करूं नये, परंतु नॉव्हेल अशी अक्षरें पुस्तकावर पाहिलीं म्हणजे पुरा शोध करून मग तें पुस्तक हातीं घ्यावें." कीर्तने यांच्या वर उद्धृत केलेल्या दृष्टिकोणातून कादंबऱ्यांच्या वाचनासंबंधीचा तत्कालीन

सुशिक्षित वर्गाचा ग्रह जसा लक्षांत येतो त्याचप्रमाणे कादंबरी या नावाखाली छापल्या जाणाऱ्या त्या काळातील लेखनाचे स्वरुप व त्याचा दर्जा यांचाही अंदाज येतो. ह्या प्रकरणाच्या प्रारंभीच्या भागांत १८६६ मध्ये म्हणजे कीर्तने यांचा 'वाचना'वरील सदर निबंध प्रसिद्ध झाल्यानंतर आठ वर्षांनी 'रत्नप्रभा' ह्या कादंबरीवर 'ज्ञानप्रसारका'त जो परीक्षणलेख प्रसिद्ध झाला त्याचा परिचय करून दिला आहे. त्या लेखाच्या प्रारंभीच्या परिच्छेदांतून सदर परीक्षणकाराने जो 'कल्पित गोष्टी'च्या वाचनासंबंधीचा लोकांच्या मनांतील प्रतिकूल ग्रह दूर करण्याचा प्रयत्न केला आहे तो ह्याच संदर्भात लक्षात घेणे उद्‌बोधक ठरते.

ह्याच ठिकाणी विनायक जनार्दन कीर्तने यांनी यानंतर दोनच वर्षांनी म्हणजे १८६० मध्ये 'मराठी ज्ञानप्रसारका'तून लिहिलेल्या एका महत्त्वाच्या लेखमालेचा निर्देश केलेला बरा: 'हिंदुस्थानांतील प्राचीन विद्या (एक स्वप्न)' ही ती लेखमाला होय. सदर लेखमाला 'ज्ञानप्रसारका'च्या जानेवारी १८६०च्या आरंभापासून सुरू झाली असून ती फेब्रुवारी, मार्च, एप्रिल, जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर १८६० ह्या महिन्यांच्या 'ज्ञानप्रसारका'च्या अंकांतून प्रसिद्ध झाली आहे. ह्या सर्व लेखमालेचा उद्देश प्राचीन संस्कृत आणि मराठी वाङ्मयासंबंधी वाचकांच्या मनात उत्साह निर्माण करणे हाच मुख्यत्वेकरून आहे. त्या दृष्टीने संस्कृत नाट्यवाङ्मय, मराठीतील दमयंतीस्वयंवरासारखी आख्यानके, गीतगोविंदासारखी काव्ये, पंचतंत्र व त्याची अनेक भाषांतून झालेली भाषांतरे, आरबी भाषेतील सुरस व चमत्कारीक गोष्टी, शुकद्विसप्तति इत्यादी कथा ह्यांची ओळख लेखकाने 'ज्ञानप्रसारका'च्या वाचकांना करून दिली आहे. (शुकबहात्तरी संबंधी बोलताना 'वाचन' ह्या निबंधात व्यक्त केलेल्या आपल्या दृष्टिकोणाला अनुसरून 'आम्हासारख्या तरुणांनी तो वाचण्याच्या घोटाळ्यांत पडू नये' असे मत व्यक्त करण्यास कीर्तने विसरले नाहीत.) लेखमालेच्या शेवटी आपल्या वाचकांचा स्वाभिमान जागृत करण्याचा आणि मातृभाषेच्या संबंधात त्यांजवर असलेल्या जबाबदारीची त्यांना जाणीव करून देण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. शेवटी म्हटले आहे, "देशात ज्या भाषांचा प्रचार आहे त्यांजमध्ये संस्कृतातील जितके रस आणवतील तितके आणा आणि तुमच्या सभोवती जे लाखो कोट्यावधी तुमचे बंधू की, ज्यांना तुम्हांशिवाय आता दुसरे तारणारे दिसत नाहीत, त्यांना

अज्ञानसागरातील भोवऱ्यातून काढून वर आणा."

ज्या कालखंडात 'मराठी ज्ञानप्रसारक' जन्मास आले तो कालखंड मोठ्या प्रमाणावर भाषांतरित ग्रंथांचा आहे. सर्वसामान्य वाचकांसाठी आणि मुख्यतः शाळाकॉलेजातील विद्यार्थ्यांकरिता अनेक इंग्रजी पुस्तकांची भाषांतरे तेव्हा होत होती. स्वाभाविकच 'मराठी ज्ञानप्रसारका'ने भाषांतराच्या संबंधात आपले विचार मांडले नसते तरच नवल. डिसेंबर १८५९ च्या 'ज्ञानप्रसारका'च्या अंकात 'भाषांतर' ह्या नांवाचाच एक लेख आहे. हा लेख अत्यंत काळजीपूर्वक लिहिण्यात आला आहे. इंग्रजीचे मराठी भाषांतर करिताना सामान्यतः कोणत्या चुका होतात ह्याचे दिग्दर्शन सदर लेखात असून 'अमक्या मनुष्यास गणिताकरिता चांगले डोके आहे', 'तुला ऊनऊन अंतःकरण आहे' (you have a warm heart) ही भाषांतरे केवळ शब्दशः झाल्यामुळे चुकली कशी ते दाखविले आहे. भाषांतरकाराने कोण-कोणती पथ्ये पाळली पाहिजेत ह्यासंबंधीचे विवेचनही चांगले उतरले आहे. ज्या 'भाषांतरामध्यें मूळग्रंथापेक्षां कांहीं कमी किंवा जास्ती असते तें दुसऱ्या गोष्टींनीं कितीहि चांगलें असो, परंतु भाषांतर ह्या दृष्टीनें तें असत्य व वाईट होय,' भाषांतर हे 'ज्यांनी त्या भाषांतराचा मूळ ग्रंथ वाचिला नाहीं व ज्यांस ज्या भाषेंत तो ग्रंथ लिहिला आहे ती भाषाही येत नाहीं त्यांजकडून व ज्यांस ती भाषा येते त्यांच्याकडून अशा दोघाहीकडून वाचलें जाईल' असे उतरले पाहिजे, 'त्यात भाषांतरकर्त्याने सुबोध व सांप्रदायिक लिहिण्याचा व अप्रसिद्ध आणि सांकेतिक शब्द जितके न घालवतील तितके न घालण्याचा धडा घेतला पाहिजे आणि सदोदित ज्या वाचणारांकरिता आपण भाषांतर करीत आहों त्यांचें ज्ञान व अभिरुचि लक्षांत ठेविली पाहिजे,' ह्या सर्वच सूचना महत्त्वाच्या आहेत. ज्या भाषेतून भाषांतर करावयाचे तिची प्रकृती व जिच्यात भाषांतर करावयाचे तिची प्रकृती ह्यांत भिन्नत्व असल्यामुळे भाषांतरकर्त्याने वाक्याला वाक्य देण्याच्या भरीस न पडता भाषांतराच्या भाषेची प्रकृती लक्षात घेऊन वाक्यरचना कशी करावी ह्यासंबंधी अत्यंत मार्मिक विवेचन लेखकाने पुढे केले आहे. मूळ लेखकाच्या शैलीचा साक्षात्कार भाषांतरात व्हावा इतपत ते भाषांतर चांगले उतरले पाहिजे अशीही लेखकाची अपेक्षा आहे. भाषांतर कसे असावे व भाषांतर करिताना भाषांतर-कर्त्याने कोणत्या प्रकारची दक्षता घ्यावी ह्यासंबंधी १८५९ साली व्यक्त झालेले

हे विचार आजही उद्बोधक ठरावेत असे आहेत.[५]

ह्या लेखानंतर ज्या लेखाकडे आपले लक्ष जाते तो लेख म्हणजे 'मराठी कवि आणि कविता' हा होय. नोव्हेंबर १८६१ च्या 'ज्ञानप्रसारका'त हा लेख आला आहे. हा लेख अपुराच राहिलेला दिसतो. तो वि० ना० पा०[६] ह्या सहीने प्रसिद्ध झाला आहे. हा लेख अभ्यासपूर्ण आहे. लेखाच्या प्रारंभी मराठी भाषा ही प्राकृत व संस्कृत ह्या दोन्हींपासून कशी निर्माण झाली ह्यासंबंधीचे भाषाशास्त्रवेत्त्यांचे मत दिलेले असून महाराष्ट्र हा शब्द प्रथम केव्हा व कोठे आढळतो ह्याचा विचार केला आहे. 'महावंसो' ग्रंथात अशोकाच्या वेळी इ. स. २४६ त महाधम्मरक्कितो नामक धर्माध्यक्षास अशोकाने महाराष्ट्र देशात बौद्धमताचा प्रसार करण्यासाठी पाठविल्याचा उल्लेख आढळतो; त्याचप्रमाणे 'विष्णुपुराणा'त 'मल्लराष्ट्र' हे ह्या देशास दिलेले नाव आढळते असे लेखक म्हणतो. ह्यानंतर मराठी भाषा कोणत्या भूप्रदेशात बोलली जाते याचे दिग्दर्शन लेखकाने केले असून मराठी लोकांच्या शरीरयष्टीचे वर्णन केले आहे. मराठी भाषा व ती ज्या भूप्रदेशात बोलली जाते यांचे एवढे वर्णन झाल्यानंतर लेखक मराठीचे आद्य कवी मुकुंदराज यांचेकडे वळतो. त्याचे म्हणणे असे की, मुकुंदराज हे शंकराचार्यांच्या नंतर थोड्याच काळात म्हणजे इ. स. १००० मध्ये होऊन गेले असावेत. बौद्धमताचा पाडाव करून वेदान्त मत प्रस्थापित करण्याच्या शंकराचार्यांच्या कार्याला त्यांनी आपल्या लेखनाने मदत केली. त्यांच्या लेखनात पंढरपूरच्या विठोबाचा उल्लेख येत नाही याचे कारण पंढरपूरचें मंदिर, कोल्हापूरचे मंदिर व इतर अनेक मंदिरे ही त्यावेळीं

---

५. 'भाषांतरा'बरोबर 'ज्ञानप्रसारका'ने दुसऱ्या एका लेखात 'निबंध लिहिणे' ह्या गोष्टीचा विचार केला आहे. (जाने. १८६२); त्यांतील पुढील विचार महत्त्वाचे आहेत. "कोणताही निबंध लिहिते वेळीं प्रथम प्रतिपाद्य विषयाचे तुकडे तुकडे करून त्याचीं प्रकरणें पाडावीं आणि शब्दगौरवाकडे विशेष लक्ष न देतां कार्यकारणसंबंधाकडे लक्ष द्यावें; आणि जें लिहिणें त्यांत चालेपर्यंत आपल्या मनांत पोकळ विचार घालूं नये."

६. वि. ना. पा. म्हणजे विनायक नारायण पाठक; हे विल्सन कॉलेजमधून मराठी विषय घेऊन श्री० म० मो० कुंटे यांच्याबरोबर बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि त्यानंतर कॉलेजमध्ये मराठीचे अध्यापक म्हणून काम करू लागले.

बौद्धांच्या ताब्यात होती. ती बौद्धधर्माचा बीमोड झाल्यावर ब्राह्मणांच्या ताब्यात आली, व त्यांतील पंढरपूरच्या मंदिरात तेथील पुंडलीक नावाच्या ब्राह्मणाने विठोबाची स्थापना केली. मुकुंदराजानंतर जवळजवळ ३०० वर्षांनी झालेले ज्ञानदेव आणि नामदेव हे पाठकांच्या मते कवित्वशक्तीत मुकुंदराजापेक्षा वरचढ नव्हते. परंतु असे असूनही ते इतके लोकप्रिय झाले याचे कारण असे की, बौद्ध किंवा पाखंड मताचा पाडाव झाला नाही तोच जी मुसुलमानी आक्रमणाला येथे सुरुवात झाली व इस्लामी धर्माच्या वर्चस्वाला प्रारंभ झाला. त्यामुळे सामान्य लोक धर्माच्या बाबतीत गांगरून गेले होते: बौद्धमत, वेदान्तमत आणि जेत्यांचे इस्लाममत ह्यांच्या गोंधळात कोणते मत स्वीकारावयाचे ते त्यांना कळेनासे झाले होते. तेव्हा सामन्यांना कळेल, आकळेल आणि एकत्र आणील असा भक्तिमार्ग ज्ञानेश्वरांनी प्रतिपादिला व त्यामुळे लोकांच्या मनांतील चांचल्य नाहीसे झाले. ज्ञानोबा-नामदेव यांच्या लोकप्रियतेचे हे कारण आहे, त्यांचे श्रेष्ठ दर्जाचे कवित्व हे कारण नव्हे असे लेखकाचे म्हणणे आहे. लेखकाची अभ्यासू आणि चिकित्सक व स्वतंत्रपणे विचार करण्याची वृत्ती लेखात ठिकठिकाणी प्रकट झाली आहे. प्राचीन मराठी वाङ्मयाकडे ऐतिहासिक दृष्टिकोणातून पाहण्याचा हा एक अत्यंत उल्लेखनीय प्रयत्न आहे. हा प्रयत्न १८६१ साली म्हणजे न्यायमूर्ती रानडे यांच्या Rise of the Maratha Power ह्या ग्रंथाच्या लेखनापूर्वी झालेला आहे हे लक्षांत घेतल्यास त्याचे महत्त्व पटावे. ही लेखमाला अपुरी राहिली. ती पुरी होणे इष्ट होते असे म्हटल्यावाचून राहवत नाही.

ह्याच संदर्भात लक्षात येणारा 'ज्ञानप्रसारका'तील एक महत्त्वाचा लेख म्हणजे 'मानभावी पंथ' हा होय. हा लेख ऑगस्ट १८६६ मध्ये प्रसिद्ध झाला हे लक्षात घेतले म्हणजे ह्या पंथासंबंधीची व त्या पंथाच्या वाङ्मया-संबंधीची माहिती मराठी वाचकांना देण्याचा प्रयत्न प्रथम केव्हा झाला याची कल्पना येऊ शकते. ह्या लेखात आरंभी पंथाच्या उत्पत्तीसंबंधीची एक कथा दिलेली असून ती आपण पंथाच्या 'लीलामृतसिंधु' व 'लीलानिधि' ह्या ग्रंथांतून घेतली आहे असे लेखकाने म्हटले आहे. लेखकाच्या मते 'लीला-मृतसिंधु' व 'भागवत' ह्यांत एकवाक्यता आहे. मानभाव पंथाचे महात्म्य मुख्यतः वऱ्हाडात आहे, मानभाव पंथाचे प्रमुख मठ, ऋद्धपूर, कारंजा, दर्यापूर, फलटण व पैठण येथे असून त्यांची नावे नारायण, नर ऋषि, प्रवर आणि

प्रशांत अशी आहेत, ह्याखेरीज पंथाचे अनेक लहान मठ ठिकठिकाणी असून ह्या मठांचे महन्त आहेत, ह्या प्रत्येक महन्ताच्या छत्राखाली १०० ते ३०० महानुभाव असून महन्तांची निवडणूक त्यांच्या शिष्यांच्या अनुमतीने केली जाते, महन्तास राजचिह्ने आहेत इत्यादी माहिती लेखकाने पुरविली आहे. पंथियांमध्ये ब्राह्मणांपेक्षा 'कुणब्यां'चा भरणा अधिक आहे, पंथियांमध्ये आश्रम दोन, पहिला संन्यासाश्रम व दुसरा गृहस्थाश्रम, संन्यासाश्रमातील स्त्रीपुरुषांनी केशवपन करणे सक्तीचे, त्यांतील स्त्रीपुरुषांच्या हातून पापाचरण घडल्यास त्यांनी विवाह करणे आवश्यक एवढे सांगून लेखकाने सदर लग्नविधीची पुढे माहिती दिली आहे. पापाचरणामुळे संन्यासाश्रमातील ज्या स्त्रीपुरुषांचा विवाह व्हावयाचा त्यांतील पुरुषाने आपली भिक्षेची झोळी स्त्रीच्या झोळीवर ठेवायची म्हणजे विवाह झाला असे समजावयाचे असे लेखक म्हणतो. लेखक ह्याच संबंधात पुढे म्हणतो, "ह्या विवाहविधीविषयी आणखी असाही प्रवाद आहे की, विवाहसमयी उभयतांनी जमिनीवर निजून मुलाने "कृष्णदेवाचा गडबडगुंडा येतो" असें म्हणावे व मुलीने "येऊ द्या" असे उत्तर देऊन दोघांनी गडबडा लोळत येऊन एकमेकांचे हात धरावे म्हणजे विवाह झाला." ह्या विवाहविधीसंबंधी माहिती दिल्यावर लेखक महानुभवांच्या संबंधात पुढील माहिती पुरवितो : महानुभाव डोक्याला व कमरेला काळे वस्त्र गुंडाळतात, अंगावर पांढरे वस्त्र परिधान करितात, हातांत बुडखा खाली व शेंडा वर असा वेळूचा दंड धारण करितात, गळ्यात १०८ मण्यांची तुळशीची माळ घालतात, त्यांना नित्य स्नानाची जरुरी भासत नाही, ते भोजनापूर्वी फक्त हातपाय धुऊन कृष्णमंत्राचा जप करितात, त्यांची आराध्यदैवते कृष्ण व दत्तात्रेय, पूजा मुख्यतः कृष्णमूर्तीची इ० ह्यानंतर लेखक महानुभावांच्या 'ओट्यां'कडे वळतो व हे मातीचे ओटे मुसुलमानी कबरींची आठवण कशी करून देतात ते सांगतो. महानुभावांच्या अहिंसा-तत्त्वावरील श्रद्धेचा आवर्जून उल्लेख करून लेखक ह्या संबंधातील त्यांच्या आचाराचा काही तपशील वाचकांपुढे ठेवतो : महानुभाव अहिंसाधर्माचे पालन करीत असल्यामुळेच गावात बळी देण्याच्या वेळी महानुभाव अगोदरपासूनच गावाबाहेर जातात, मठप्रवेश व गावप्रवेश करण्यापूर्वी मठावर व सभोवती कृष्णतीर्थाचे प्रथम सिंचन करितात, पाणी गाळून पितात, गुरांना कोरडा चारा घालतात. महानुभाव महन्त व साधु चतुर्मासात मठाबाहेर पडत नाहीत; चतुर्मासानंतर आठ महिने देशात फिरतात,

ते गावात न उतरता, गावाबाहेर मैदानात तळ देतात, त्यांचा गावाला कोणत्याही प्रकारे उपद्रव नसतो, त्यांच्या स्वारीचा थाट प्रेक्षणीय असतो, जेवताना एकदाच सर्व वाढप करितात, (दोन भाकरी व भाजी वगैरे), गुरुची आज्ञा शिरसावंद्य मानतात, ते अनेक प्रकारची कारागिरीची कामे करू शकतात व स्वभावाचे गरीब व सहनशील असतात इत्याहि माहिती पुरवून लेखक त्यांच्या वाङ्मयाकडे वळतो. हे वाङ्मय वेगवेगळ्या लिपींमधून केलेले आढळते ही महत्त्वाची माहिती देऊन पुढील ग्रंथांची नावे तो शेवटी सादर करितो लीलानिधि, लीलामृतसिंधु, रुक्मिणीस्वयंवर, बाललीला, गोपीविलास. हे सर्व ग्रंथ ओवीबद्ध आहेत अशीही तो माहिती देतो. लेखात सर्वत्र मानभाव हाच शब्द योजताना लेखक आढळतो.

माझ्या कल्पनेप्रमाणे महानुभावांसंबंधी इतकी तपशीलवार माहिती १८६६ पूर्वी मराठी वाचकांना कोणीही पुरविलेली नसावी. ही माहिती गॅझेटियरमधून घेतलेली नाही हे गॅझेटियर वाचल्यास आढळून येते. ज्या लेखकाने ही माहिती पुरविलेली आहे त्याने ती परिश्रमपूर्वक जमा केलेली आहे असे उघड दिसते. वरील माहितीत महानुभाव पंथ-संस्थापक श्री चक्रधर याचा उल्लेख नसला तरी महानुभावांच्या आचार-विचारांसंबंधी पुष्कळच मोलाचा माहिती-वजा तपशील आहे हे मान्य करायला हवे. कै. राजवाडे व त्यांच्यानंतरचे संशोधक महानुभावांसंबंधी लिहू लागण्यापूर्वी कितीतरी वर्षे अगोदर प्रसिद्ध झालेला हा लेख आहे हे लक्षात घेतल्यास 'मराठी ज्ञानप्रसारकाने' संशोधनाच्या क्षेत्रातही आपल्या परीने केवढे महत्त्वपूर्ण कार्य करण्यास प्रारंभ केला होता याची कल्पना येईल.

'ज्ञानप्रसारका'च्या १८६४ मधील दुसऱ्या अंकापासून दहाव्या अंकापर्यंत आलेली 'चंद्रहास नामक राजपुत्राचा इतिहास' ह्या नावाची एक मनोरंजक रासेलससारख्या कथेवरून किंवा एखाद्या तत्समान कथेवरून लेखकास स्फुरलेली बोधकथा असावी असे वाटते. तिच्यात कल्पकतेचा विलास बराच आहे; परंतु विविध विषयांबाबत वाचकास बोध द्यावा हाच तिचा प्रमुख लेखनहेतु आहे. कथा अशी आहे की, एका सर्व सुखसोयींनीं युक्त असणाऱ्या बंदिस्त उद्याननगरीत अनेक स्त्रीपुरुष राहात आहेत. त्यात एक तरुण राजपुत्र आहे. भोवती सुखसागर पसरलेला असूनही हा राजपुत्र सुखी नाही. तो सुखाच्या बंदिवासातून बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत आहे. हा त्याचा प्रयत्न चालू असताच त्याच

त्या उद्याननगरीतील इतर व्यक्तींशी परिचय होत आहे व त्यांच्या हकीकती ऐकत असता त्याला आपोआपच जगाचे ज्ञान होत आहे. एके दिवशी हा राजपुत्र त्या उद्याननगरीतील एका रहिवाशाच्या मदतीने आपल्या बहिणीला घेऊन मोठ्या प्रयासाने त्या सुखाच्या बंदिशाळेतून बाहेर पडतो; नेमके येथेच ह्या दीर्घकथेचे 'ज्ञानप्रसारका'तील मुद्रण थांबते व आपले ह्या राजपुत्राचे पुढे काय झाले ह्यासंबंधीचे कुतूहल अतृप्तच राहते.

ह्या चंद्रहास राजपुत्राला विश्वावसु नामक एका पुरुषापासून जे विविध प्रकारचे ज्ञान मिळते त्यात एके ठिकाणी कवित्वाचे विवेचन आढळते. ह्या विश्वावसूने त्रिखंड प्रवास केलेला असतो, अनेक अनुभव घेतलेले असतात. आपण जेथे जेथे गेलो तेथे तेथे कवितेला आणि कवित्वाला जेवढा मान मिळे तेवढा कोणत्याच गोष्टीला मिळत नसे असे विश्वावसु चंद्रहासाला सांगतो. तो म्हणतो, "याचें कारण कदाचित् असें असेल कीं, कोणत्याही प्रकारचें ज्ञान होणें तें पायरीपायरीनें उत्तरोत्तर प्राप्त होतें; परंतु कवित्व ही देणगी एकदम प्राप्त होत्ये ...स्वभावसिद्ध वस्तु व मोहादी षड्रिपु हेच बहुधा कवितेचे विषय होत व ते सृष्टीच्या उत्पत्तीपासून आजपावेतों सारखेच राहिले आहेत." विश्वावसूच्या मते आदिकवींनी हे विषय आपल्या काव्यामधून जे प्रकट केले "त्यांचेंच पुनर्लेखन व त्यांचा स्थलव्यत्यास करून निरनिराळी स्वरूपें करून दाखविणें यावाचून" नंतरच्या कवींस काही बाकी राहिलेले नाही; तेव्हा आजचे कवीही तेच करीत आहेत. विश्वावसु हा स्वतः कवी आहे. आपण कवी व्हावयाचे ठरविल्यावर आपणांस कोणतीच गोष्ट, कोणताच अनुभव हा निरर्थक नाही हे कसे जाणवले ह्याचे वर्णन विश्वावसूने मोठे बहारदार केले आहे. तो म्हणतो, "अगदी क्षुल्लक खडकापासून रत्नखचित राजवाड्यापावेतों एकसारखेंच लक्ष लावून मीं पाहिलें. कधीं कधीं नदीचीं वाकें असतील तिकडेच जावें, कधीं कधीं मेघांची गति पहात असावें. कारण कवीला कोणतेंही निरुपयोगी नाहीं. यावत् सुंदर, मनोहर व भयंकर त्या सर्वांची त्याला उत्तम रीतीची माहिती पाहिजे. जें म्हणून अतिशयित स्थूल व त्याचप्रमाणे जें अतिशयित सूक्ष्म असेल त्या दोघांचाही त्यास उत्तम रीतीचा परिचय पाहिजे...कारण या प्रकारची माहिती असल्यानें कोणत्याही न्याय किंवा धर्मांचा (च्या) विषयाची अन्याचा (च्या) अन्तःकरणावर अलंकारिक रीतीनें व जोरानें प्रतीति करून देतां येत्ये आणि ज्या (ज्या)स अशा प्रकारची परिपूर्ण माहिती असेल तोच स्वकल्पना अनेक सुरस

रीतीनें प्रकाश करूं शकेल आणि रसिक जनास अतिगूढ व विजातीय कल्पनांनीं व अकल्पित उपदेशपर स्वारस्यानें रंजविण्याची शक्ति त्याचीच होय."

कवीला यच्चयावत गोष्टींचे ज्ञान करून घेता येणे कसे शक्य आहे अशी शंका जेव्हा चंद्रहास विश्वावसूला विचारतो तेव्हा विश्वावसु म्हणतो, "यावत् वस्तुमात्रांचा विचार करीत बसणें हें कवीचें कर्म नव्हे, परंतु तो जातिज्ञान मात्र करून घेतो, सर्वसाधारण धर्म कोणते हें पाहतो व तसेंच ज्या दर्शनार्ह महान् वस्तु असतात त्यांकडे लक्ष पोंचवितो. गुलाबाचा (च्या) फुलांचा (च्या) पाकळ्या अगर त्याचा (च्या) रंगांचा (च्या) छटा मोजीत नाहीं अथवा वनांतील वृक्षादिकांचा (च्या) सौंदर्यांचा (च्या) सूक्ष्म छाया पाहात राहात नाहीं. त्याचें एवढेंच कर्तव्य कीं, जी कोणती गोष्ट कवि वर्णीत असतो तिचे मुख्य मुख्य धर्म सांगून कोणीकडून तरी वर्णनविषयीभूत व्यक्तीची प्रतीति वाचणारास करून द्यावी. आणि त्या वस्तूचे अतिसूक्ष्म धर्म वर्णित करण्याची कांहीं जरुरी नाहीं." पुढे विश्वावसु म्हणतो, "परंतु स्वभावसिद्ध गोष्टींची माहिती झाली म्हणजे कवीचें कार्य झाले असें नाहीं, कारण सांसारिक गोष्टीचें ज्ञान हें अर्धें कवित्व होय. कवि हें नांव जा (ज्या)ला मिळवणें आहे, त्यानें प्रत्येक स्थितीपासून होणाऱ्या सुखदुःखांची यत्ता ठरविली पाहिजे. मनुष्याचा (च्या) अंगांतील प्रत्येक मनोभावाचे व त्यांचा (च्या) अनेक संमिश्रणाचे धर्म कळले पाहिजेत, व देश, काल व लौकिक रीतिभातींचा (च्या) योगेकरून क्षणिक व अकल्पित होणाऱ्या कारणांस्तव, अथवा देशांतील न्याय धर्मांचा (च्या) योगानें मनावर होणाऱ्या परिणामांपासून, चंचल बालत्वापासून वयातीतपणापावेतों मनाची वृत्ति कशीकशी बदलत जात्ये, तिचा थांग लाविला पाहिजे. आपल्या देशांत व आपल्या कालांत जा (ज्या) इतर लोकांत गैरसमजुती चालू असतात, त्यांपासून त्यानें अलिप्त राहिलें पाहिजे. सत्यास त्याचा (च्या) अनेक अनित्य स्वरूपापासून नित्य स्वरूपात आणिलें पाहिजे. कवीनें आपल्या वेळचीं लौकिक मतें, कायदे यांजकडे विशेष लक्ष न देतां जें सर्वसाधारण व कालत्रयींही सारखें राहणारें व सर्वोत्कर्ष जें सत्य त्यासच मान द्यावा." कवी कितीही विद्वान झाला तरी त्याने जागतिक कीर्तीची अपेक्षा करीत बसू नये, आपले लेखन 'यथार्थ' होते आहे की नाही ह्याकडे त्याचे केवळ सतत लक्ष असावे असे विश्वावसु सुचवितो. 'त्याच्या लेखनाची सरणीही त्याचा (च्या) विचारानुकूल योग्य पाहिजे आणि अत्यंत श्रम करून पदलालित्याचे सूक्ष्म मार्दव, यमकादि

अर्थगौरव व अर्थचातुर्य हीं त्याचा (च्या) स्वाधीन असून लेखांत तशीं मूर्तिमंत उभीं राहिलीं पाहिजेत' असे म्हणून त्याने ह्या विवेचनाचा शेवट केला आहे.

विश्वावसूच्या मुखाने प्रस्तुत बोधकथेत लेखकाने रेखाटलेले कवीच्या कार्यपद्धतीचे आणि कवितेच्या प्रयोजनाचे चित्र निश्चित लक्षणीय आहे. ज्या काळात ते रेखाटले गेले आहे त्या काळातील प्रचलित काव्यविचार लक्षात घेता त्याची अभिनवता आणि त्यामागील वृत्तिगांभीर्य आपणांस जाणवल्याखेरीज राहात नाही. 'राजा शिवाजी' काव्याचे लेखक आणि प्रस्तावनाकार म. मो. कुंटे आणि कवी व त्याचे काव्य ह्यासंबंधी प्रारंभापासून अखेरपर्यंत (१८८५–१९०५) गंभीरपणे चिंतन करणारे आधुनिक मराठी कवितेचे जनक केशवसुत ह्यांच्या काव्यविचारांची चाहूल विश्वावसूच्या वर उल्लेखिलेल्या काव्यविचारात लागावयास हरकत नसावी. केशवसुतपूर्व कालात म्हणजे म. मो. कुंटे यांच्या कालात एकंदर काव्यविचार कोणत्या नव्या दिशेने वाटचाल करू लागला होता हे वरील 'पद्यात्मक कवितेसंबंधीच्या संवादा' वरून आणि 'कविता म्हणजे काय' ह्या १८५४ मधील ह्यापूर्वीच उल्लेखिलेल्या 'ज्ञानप्रसारका'-तील लेखावरून वाचकांच्या लक्षात येईल.

आपण आतापावेतो 'मराठी ज्ञानप्रसारकात' स्वतंत्र लेखरूपाने कविता म्हणजे काय, कवीवरील जबाबदारीचे व त्याच्या कार्यपद्धतीचे स्वरूप, प्राचीन मराठी वाङ्मयाची प्रवृत्ती, मानभाव पंथ, कादंबऱ्यांचे वाचन, भाषांतर कसे असावे इत्यादी विषयांचा विचार कसा झाला ते पाहिले. 'ज्ञानप्रसारका'तून झालेला हा विचार ज्या काळात झाला त्या काळाच्या दृष्टीने तो निःसंशय अत्यंत लक्षणीय ठरतो. परंतु 'मराठी ज्ञानप्रसारक' मधील वाङ्मयविचाराच्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाचा लेख 'लिहिण्याची शैली' हा होय, असे मला वाटते. हा निबंध एप्रिल १८६३ च्या अंकात प्रसिद्ध झालेला असून त्याला 'हा निबंध रा. जनार्दन सखाराम गाडगीळ[७] यांनीं मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढें ता. २८ माहे नोव्हेंबर १९६२ रोजीं वाचला' अशी तळटीप जोडलेली आहे.

---

७. दाते यांच्या ग्रंथ-सूचीत श्री. जनार्दन सखाराम गाडगीळ हे १९०० मध्ये वारल्याचा उल्लेख आढळतो; व त्यांचे नावावर पुढील ग्रंथ आढळतात :
हिंदुधर्मशास्त्रसार. पुस्तक १ ले. दायग्रहण (इंदुप्रकाश मुंबई १८६८)
हिंदुधर्मशास्त्रसार. पुस्तक २ रे. दायविभाग (इंदुप्रकाश, मुंबई १८७०)

हा निबंध अत्यंत परिश्रमपूर्वक लिहिलेला असून त्यात व्यक्त झालेले विचार हे जसे संस्कृतोद्भव नाहीत त्याचप्रमाणे त्यात शैलीसंबंधीच्या त्या काळातील इंग्रजी विचारांचाही केवळ अनुवाद करण्याचा प्रयत्न दिसत नाही; तर थोड्याफार स्वतंत्रपणे ह्या प्रश्नाचा विचार करण्याची इच्छा दिसते व प्रयत्न दिसतो हे लक्षात घेण्याजोगे आहे. येथे लेखक 'लिहिण्याच्या शैली'चा केवळ सर्वसामान्य विचार करीत आहे. लेखनाचे शास्त्रीय वा ललित असे विभाग पाडून प्रत्येकाच्या शैलीचा स्वतंत्रपणे विचार करण्याची जी आजची पद्धत ती अर्थातच येथे नाही. ती जाणीवहि नाही. (आजही मराठीत शैलीसंबंधी विचार करू पाहणाऱ्यांमध्ये ती नेहमीच दिसून येते असे नाही; तेव्हा ती १८६२ मध्ये कोठून उदयास आलेली असणार?)

लेखकाने शैलीसंबंधी केलेला हा विचार सामान्यतः सर्वच प्रकारच्या गद्य लेखनाला उद्देशून केलेला असला तरी त्याच्या चिंतनाचा विषय मुख्यतः निबंधलेखन आहे असे स्पष्ट दिसते; म्हणजे मुख्यतः निबंध 'लिहिण्याच्या शैली'चा विचार तो करितो आहे, व त्या दृष्टीने उत्तम लेखनशैलीची वैशिष्टये कोणती ते सांगण्याचा त्याने प्रयत्न केला आहे. लेखक प्रारंभीच म्हणतो, "लिहिण्याची शैली, जीस इंग्रजींत Style म्हणतात, या शब्दानें भाषा-चातुर्याचा बोध होतो, आणि मुख्यत्वेंकरून त्याचाच बोध व्हावा व आजचा(च्या) निबंधांत भाषेची शैली चांगली म्हणजे काय, व कोणत्या खुणांकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे याचविषयीं लिहावयाचें आहे, परंतु भाषाचातुर्याखेरीज शैली चांगली येण्यास ग्रंथांत दुसरा एक गुण लागतो त्याजविषयीं प्रथमतः लिहिलें पाहिजे."

येथे लेखक ज्या गुणाचा उल्लेख करीत आहे तो म्हणजे "जें आपण लिहिलें आहे त्या सर्व लिहिण्याचा संबंध स्पष्टपणें वाचणारांचा(च्या) लक्षांत यावा" हा होय. लेखक एवढे सुचवून थांबत नाही. तो पुढे म्हणतो की, कोणत्याही लेखनाचा वाचकाच्या मनावर होणारा संस्कार हा केवलस्वरूपी असला पाहिजे, त्यात कोणत्याही प्रकारचा विस्कळीतपणा येता कामा नये. त्याचे शब्द असे आहेत, "जेवढे जेवढे विषय आपण आपल्या ग्रंथांत अथवा निबंधांत घेतले आहेत त्या सर्वांचा एक ठसा आपल्या मनावर उमटून, तो वाचणारांच्या मनावर उठला पाहिजे." लेखकाच्या विचारसरणीवर इंग्रजी वाङ्मयविचारांचे, विशेषतः unity of effect ह्या कल्पनेचे संस्कार झाले होते हे ह्यावरून

उघडच दिसते. आपल्या म्हणण्याच्या पुष्टयर्थ त्याने दिलेली उदाहरणेही पाश्चात्य लेखकांचीच आहेत. ती ॲडिसन, मेकॉले, जॉनसन यांच्या लेखनातील आहेत. लेखन हे सुसूत्र असले पाहिजे, तद्वारा एखाद्या विषयाचा योग्य उलगडा झाला पाहिजे, "त्यांतील विषयाचा गोषवारा पूर्वी ध्यानांत आणून, तो विषय कलमवार उलगडीत गेलें पाहिजे" असे लेखकाचे म्हणणे. लेखनात ही विवेचनाची सुसूत्रता जाणवल्यानंतरच लेखकाच्या भाषाचातुर्यांचे भान वाचकास होते असे त्याने म्हटले आहे. तो म्हणतो, "याप्रमाणें लिहिलेल्या विषयात विचाराचें सूत्र नीट असलें म्हणजे मग भाषाचातुर्यांचे गुण वाखाणण्यास वाचणारांस सुचते... जा (ज्या) लिहिण्यांत विचाराचा अंश कमी दिसतो व ती कमताई मुख्यत्वेंकरून विषयाच्या निरनिराळ्या भागांचा संबंध दाखविण्यांत दिसून येत्ये, तेथें भाषेचा (च्या) बाह्य अलंकाराकडे लक्ष देण्यास वाचणारास (निदान सूज्ञ वाचणारास तरी) धीर धरवत नाहीं. जेथें मूळ काया नीट नाहीं, तेथें कोणी अलंकार पाहत बसत नाहीं !"

निबंधलेखकाचा लेखनशैलीसंबंधीचा दृष्टिकोण वरील स्वरूपाचा असल्या-मुळे त्याने आपल्या विवेचनात अलंकृत लेखनाला कोठेही वाजवीपेक्षा अधिक महत्त्व दिलेले दिसत नाही. उलट अलंकरण म्हणजे शैली ह्या गैरसमजुतीपायी लेखनाची स्थिती कशी होते, अशा प्रकारचे लेखन पुष्कळदा "इंग्रेजींत musical nonsense' म्हणतात तसें" कसे होते व अशा प्रकारच्या लेखनाची सवय झाल्याने "लिहिणारे मनुष्य विचाराच्या कामास निरुपयोगी होतात व नेहमीं कांहीं वेडेवेडे कसे लिहितात" ते लेखकाने स्पष्ट केले आहे. लेखकाचे असे स्वच्छ मत आहे की, "भाषेचें ज्ञान चांगलें झालें नाहीं व विचार प्रौढ झालें नाहींत तोंपर्यंत चांगली (ल्या) शैलीचे जे बाह्यगुण म्हणजे शब्दालंकारादि प्रकार, हें साधण्याविषयीं प्रयत्न न करितां चांगला लिहिण्याचा पाया जो स्पष्ट लिहिणें व विचाराचा ओघ दाखविणें तो साधण्याविषयीं महान् प्रयत्न करावा."

अलंकरण म्हणजे शैली नव्हे हा मुद्दा स्पष्ट केल्यानंतर लेखक शैलीच्या संदर्भातील एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित करितो. तो म्हणतो, एखाद्या घरगुती किंवा सरकारी कागदपत्रातील लेखनात अनेकदा विचारांची स्पष्टता असते, त्यात एकही शब्द वायफळ नसतो; परंतु असे असूनही ते लेखन "कोणी चांगल्या शैलीनें लिहिलें आहे असें विशेषण लावीत नाहीं" ते का ? सदर

लेखकाने उपस्थित केलेला हा प्रश्न महत्त्वाचा नाही असे कोण म्हणेल? ह्या प्रश्नाचे त्याने दिलेले उत्तर अचूक आहे असे नव्हे परंतु हे उत्तर शोधण्यासाठी त्याने ज्या दिशेने पावले टाकली आहेत ती दिशा अत्यंत सूचक आहे. वरील प्रश्नाचा विचार करण्यास मदत व्हावी म्हणून लेखकाने आणखी एक प्रश्न उपस्थित केला आहे. तो प्रश्न असा की, आपणांस चित्रापासून आनंद का होतो. एक प्रश्न सोडविण्यासाठी दुसरा संबद्ध आणि उपकारक प्रश्न उपस्थित करणे ही सदर निबंधलेखकाने अवलंबलेली पद्धत वाङ्मयविचार करू पाहणाऱ्यांना अपरिचित नाही. चित्रदर्शनाने आपल्याला होणाऱ्या आनंदाच्या संबंधात लेखकाचे म्हणणे असे आहे की, "आपणापुढें जें चित्र ठेवलें आहे त्यावरून आपल्या मनापुढें काल्पनिक साक्षात पुतळा जेव्हां उभा राहातो व बाहेरील चित्र वास्तविक सजीव पदार्थ आहे असा भास उत्पन्न करून सजीव प्राण्यात जे हास्य, दुःख, विचार इत्यादि उद्गार दिसून येतात ते जेव्हां त्या चित्राच्या अंगीं भासूं लागतात तेव्हां त्याजपासून आनंद होतो. कल्पनाशक्तीची अत्यंत परिपूर्णता म्हटली म्हणजे चित्रलेखन, तशीच कविता कीं, जे तिचे विषय त्यांत मनुष्याच्या मनांतील विचारादि सर्व उद्गार मूर्तिमंत डोळ्यांपुढें उभे करणें. कल्पनाशक्तीचें जर विचारशक्तीशीं एक मीलन नाहीं तर तिचें तेज पडत नाहीं; आणि त्याचप्रमाणें विचारशक्तीचा (च्या) विषयांत कल्पनाशक्तीचा अंश नसला, तर विचारशक्तीचें पडावें तसें तेज पडत नाहीं." चित्र आणि काव्य ह्यांत कल्पनाशक्तीचे कार्य कोणत्या प्रकारचे असते ते चित्रापासून आनंद का होतो ह्या प्रश्नाचा विचार करण्याच्या निमित्ताने स्पष्ट केल्यावर निबंधलेखक मुळात ज्या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी हा दुसरा प्रश्न उपस्थित केला गेला त्या मूळ प्रश्नाकडे वळतो. त्याचे म्हणणे असे की, घरगुती किंवा सरकारी कागदपत्रांतील लेखनात निःसंदिग्धता आणि अल्पाक्षरत्व असले तरी त्यात कल्पनाशक्तीच्या विलासाला वाव न मिळाल्यामुळे ते चांगल्या शैलीने लिहिले गेले आहे असे कोणीही समजत नाही; लेखन शैलीदार होण्यासाठी त्यात कल्पनाशक्तीला वाव मिळणे आवश्यक असते.

कल्पनाशक्ती आणि विचारशक्ती यांचे ऐक्य झाल्याखेरीज, त्यांना एकमेकांचे साहाय्य असल्याखेरीज लेखनात सौंदर्य अवतरणे शक्य नाही असे लेखकाचे मत आहे. तो पुढे म्हणतो, "लिहिण्याची शैली चांगली साधण्यास विचार-शक्ति व कल्पनाशक्ति यांचें ऐक्य केलें पाहिजे...ह्या दोन्ही शक्तींचें जेथें

ऐक्यत्व नाहीं तो विषय मनास फार वेळ रुचत नाहीं. ह्या शक्तींचा परस्पर असा संबंध आहे कीं, एक दुसरीशिवाय फिकी पडते." लेखक मुख्यतः निबंधात्मक लेखनाच्या शैलीचा विचार करीत आहे हे लक्षात घेतल्यास त्याचे हे 'चांगल्या शैली' संबंधीचे विवेचन कसे बरेचसे अचूक आहे ह्याची कल्पना येते. निबंधलेखनात नितळपणा व पारदर्शकत्व येते, त्याला खऱ्या अर्थाने देखणेपण लाभते ते विचारशक्तीला कल्पनाशक्तीची जोड मिळते तेव्हाच; तेव्हाच अरूपाला रूप येते, अगोचर गोचर होऊ लागते आणि अमूर्त हे मूर्तिमान बनत असते. 'ज्ञानप्रसारक' सभेपुढे १८६२ साली निबंध वाचणाऱ्या गाडगिळांनी हे ओळखले होते व म्हणूनच 'लिहिण्याच्या शैली'चा विचार करिताना ज्या दिशेने त्यांची पावले पडताना दिसत होती.

लेखनशैलीच्या संदर्भात विचारशक्ती आणि कल्पनाशक्ती यांच्या ऐक्याचे महत्त्व प्रतिपादल्यावर निबंधकार लेखनात 'कल्पनाशक्तीचा उपयोग कोणत्या रूपांनीं करण्यांत येतो' ह्याकडे वळतो. त्याच्या मते "लेखनकौशल्यांत कल्पनाशक्तीचा दोन प्रकारांनीं उपयोग करितात : एक शब्दयोजनेंत तिचें चातुर्य दाखविणें व दुसरें नाना प्रकारच्या अलंकारांनीं व विषयास योग्य व कल्पना-शक्तीस तोषविणारे असे लहान लहान विषय मध्यें मध्यें घालून विषय मनोरंजक करणें." शब्दयोजनेच्या संदर्भातील पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे 'योग्य शब्दांची योजना करणें' ही असून ती कल्पनाशक्तीच्या कक्षेत येत नसून विवेचकशक्तीच्या कक्षेत येते ह्याची निबंधलेखकाला जाणीव आहे; परंतु "जास (ज्यास) संस्कृतांत पदललित्य म्हणतात तें साधणें मात्र कल्पनाशक्तीच्या मदतीशिवाय कठीण आहे" असे त्याचे म्हणणे आहे. पदलालित्यात लेखक पुढील गोष्टींचा अन्तर्भाव करितो : १) 'त्याच त्या स्वराचे शब्द पुनः घालणें;' २) 'द्व्यर्थी शब्दांची योजना करणें कीं, चालत्या विषयास तर तो शब्द योग्य असून त्याजपासून दुसरी कांहीं सुंदर कल्पना मनांत यावी', ३) 'वाक्यांत बुध्द्या उपमा, उत्प्रेक्षा न घालतां सहज एखाद्या शब्दापासून तिचें वाचणारांस अथवा ऐकणारांस दिग्भावप्रदर्शन मात्र व्हावें,' ४) 'सर्व जातीविषयीं बोलावयाचें असून त्या जातींत जी ठळक व रमणीय वस्तु तिजविषयींच मात्र बोलून त्याजपासून जातीविषयीं बोध करावयाचा.' निबंध-लेखकाच्या मते पदलालित्याच्या ह्या जाती जरी मुख्यत्वेकरून पद्यात्मक लेखनात आढळत असल्या तरी त्यांचा गद्यात्मक लेखनात उपयोग करिता येतो

व 'तेणेकरून लिहिण्यास माधुर्य येतें;' परंतु हे म्हणत असताना तो एक धोक्याची सूचना देण्यास विसरत नाही. पुढच्याच वाक्यात तो म्हणतो, 'एवढें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, गद्यात्मक लिहिण्यांतही त्यांचा फार कमी उपयोग करावा, कारण फार उपयोग केल्यानें वाचणारांचा(च्या) किंवा ऐकणारां(च्या) मनांत असें वाटूं लागतें कीं, हा केवळ शुद्ध सुंदर लिहिणाराच फक्त आहे." अलंकृत लेखनाला निबंधकाराने प्रारंभापासूनच फारसे महत्त्व दिलेले नसल्यामुळे त्याची ही भूमिका त्याच्या पूर्वोक्त मताशी सुसंगतच ठरते. पदलालित्यासंबंधीच्या आपल्या विवेचनाला लेखकाने मराठी लेखनातील अनेक उदाहरणांची जोड दिली आहे, परंतु ही सर्व उदाहरणे देऊन शेवटी लेखकाने म्हटले आहे ते हेच की, "साधारण लिहिण्यांत अलंकारांची फार नेमस्त योजना करावी. वरील उताऱ्यांत अलंकार आहेत परंतु स्वाभाविक लिहिण्यास जेवढे योग्य तेवढेच आहेत. बुद्ध्या विचार करून उपमा किंवा उत्प्रेक्षा आंत घातली आहे असें साधारण लिहिण्यांत अगदीं भासूं नये."

पदलालित्य साधण्याच्या कामी कल्पनाशक्तीचा चांगल्या लेखनाला कसा उपयोग होतो, त्या लेखनात त्यामुळे सौंदर्य कसे निर्माण होऊ शकते याचे विवेचन केल्यानंतर लेखक 'वाक्यलालित्य' आणि 'विचारलालित्य' ह्या उत्तम शैलीला आवश्यक ठरणाऱ्या दोन गुणांकडे वळतो. 'वाक्यलालित्य' आणि 'विचारलालित्य' हे चांगल्या शैलीचे 'प्रधान गुण' आहेत असेच लेखकाचे मत आहे. आपण 'वाक्यलालित्य' आणि 'विचारलालित्य' हे शब्द एका विशिष्ट अर्थाने वापरीत असून 'त्या शब्दांचा संस्कृत ग्रंथकारांनीं कोणत्या अर्थानें उपयोग केला आहे हें मला माहीत नाहीं' हे निबंधलेखकाने प्रारंभीच स्पष्ट केले आहे. 'वाक्यलालित्य' ह्या शब्दाने लेखकाला दोन गोष्टी सुचवायच्या आहेत: पहिली प्रत्यक्ष वाक्यरचनेसंबंधीची: लेखकाचे म्हणणे असे आहे की, वाक्यरचनेत सरलत्व असावे; 'समजायास वाक्य दोनतीनदा वाचण्याची गरज पडूं नये.' परंतु याचा अर्थ वाक्ये लहानच योजावीत असा नसून ती प्रसंगविशेषी मोठी असली तरी 'उपवाक्याबरोबर वाचणाराचा (च्या) मनाचे गमन होईल' अशी हवीत. 'वाक्यलालित्य' ह्या शब्दाने लेखकाला अभिप्रेत असलेली दुसरी गोष्ट म्हणजे त्यामधील 'कल्पनाशक्तीचा (च्या) अंशाची.' हा 'कल्पनाशक्तीचा अंश' समर्पक अलंकारांच्या द्वारा वाक्यार्थास कसा गोचर करतो ते लेखकाने परत एकदा स्पष्ट केले असून तसे झाल्याशिवाय

अलंकार हा खऱ्या अर्थाने 'शोभविणारा पदार्थ' कसा ठरत नाही ते दाखविले आहे.

वाक्यलालित्यासंबंधी एवढे विवेचन केल्यावर लेखक 'विचारलालित्य' ह्या शैलीच्या संदर्भातील दुसऱ्या 'प्रधान गुणा'कडे वळतो. 'विचारलालित्य' ह्या शब्दाने लेखकाला काय सुचवायचे आहे ? लेखकाला म्हणायचे ते असे की, विचारांना प्रौढत्व प्राप्त झाल्याखेरीज लेखनाला शोभा येणे कठीण आहे हे तर खरेच; परंतु विचार केवळ गहन असून भागणार नाही तर ते व्यक्त होताना रंजक ठरतील अशा रीतीने त्यांची अभिव्यक्ती साधली पाहिजे. जे जात्याच गहन आहे ते हसत खेळत ऐकणाऱ्याच्या वा वाचणाऱ्याच्या गळी उतरविण्याचे कौशल्य लेखकाच्या ठिकाणी असायला हवे; आणि हे कौशल्य त्याचे लेखणीत तेव्हाच येईल की, जेव्हा कल्पनाशक्ती त्याजवर प्रसन्न असेल. 'कल्पनाशक्तीच्या मदतीशिवाय ग्रंथांत मध्यें मध्यें कित्येक गोष्टींचीं वर्णनें आणून अथवा विषयाचा (च्या) संबंधानें कांहीं दुसऱ्या गोष्टी आंत आणून ग्रंथ मनोरंजक'करिताच येणार नाही; परंतु लेखन रंजक व्हावे एवढ्यासाठी लेखकाने त्यात अप्रस्तुताला मात्र स्थान देता कामा नये हे सांगावयास निबंधकार विसरलेला नाही. त्याचे शब्द असे आहेत, 'परंतु ही खुबी करण्यांत मोठी चतुराई लागते, नाहींतर प्रकृत विषयाचा (च्या) न लागू अशा गोष्टी, लिहिणारानें आंत घातल्या आहेत अशी ऐकणारांची अथवा वाचणारांची समजूत होईल.'

'लिहिण्याच्या शैली' संबंधीचे हे विवेचन येथे संपते. परंतु ते संपविण्या-पूर्वी 'सध्या (१८६२) बाल्यावस्थेंत असणारी जी मराठी भाषा तींत वर सांगितलेले भाषाचातुर्याचे रस साधतील कीं नाहीं याचें थोडेंसें अनुमान होण्यास जे कांहीं सुरस लेख गद्यांत झाले आहेत त्यांतून कांहीं थोडे उतारे' लेखकाने उद्धृत केले आहेत. हे उतारे पुढील लेखनातून घेतलेले आहेत: दादोबा पांडुरंग यांच्या व्याकरणाची प्रस्तावना, 'मराठी कोलंबस' (बहुधा 'कोलंबसाचा वृत्तांत'—ले० महादेव गोविंद कोल्हटकर, अमेरिकन मिशन प्रेस, १८४९), 'थोरले माधवराव पेशवे' (ले० विनायक जनार्दन कीर्तने, १८६१, उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचलेले नाटक), सदाशिव काशिनाथ छत्रे यांच्या 'बाळमित्रा'ची प्रस्तावना, 'यमुनापर्यटन' (१८५६. ले० बाबा पद्मनजी)ची प्रस्तावना. हे सर्व उतारे गद्य आहेत. ह्याखेरीज दोन पद्य उतारे अनुक्रमे प्राकृत कवितेचे पुस्तक पहिले व पुस्तक दुसरे ह्यांतून उद्धृत

केले आहेत. (हे पद्यात्मक उतारे देताना लेखकाला मुख्यत्वे भाषांतराच्या शैलीचा विचार करावयाचा आहे.) हे उतारे देऊन केवळ निबंधकार थांबलेला नाही तर प्रत्यक्ष विवेचनाच्या ओघात आपण जी चांगल्या शैलीची वैशिष्ट्ये सांगितली ती ह्यांतील प्रत्येक उताऱ्यात कितपत आढळतात ह्याचाही त्याने जाता जाता विचार केला आहे; व शेवटी अशी सूचना दिली आहे की, 'वर जे लिहिण्याच्या शैलीचे निरनिराळे गुण सांगितले ते साधण्यांत इतकें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, एकच गुण एथपासून तेथपर्यंत साधून उपयोग नाहीं. मनास आनंद होण्याचें मुख्य तत्त्व एकच पदार्थ त्यापुढें नसणें हें आहे; आणि म्हणून एकच अलंकार पुनःपुनः आणूं नये हें अवश्य आहे.' ह्या सूचनेबरोबरच लेखकाने आणखी एक महत्त्वाचा खुलासा केला आहे. तो असा की, 'असे निबंध ऐकल्यानें अथवा लिहिल्यानें देखील म्हणजे, चांगली शैली साधते असें नाहीं; ती साधण्यास लिहिण्यावर परिश्रम केले पाहिजेत आणि कांहीं अंशीं ही बुद्धीची गोष्ट आहे. परंतु असे विषय लिहिण्याचा व ऐकण्याचा एवढा उपयोग आहे कीं त्याचा (च्या) योगानें जे या परिश्रमांत गुंतले आहेत त्यांस कांहीं अंशीं साधन होऊन निदान भलतीकडे तरी श्रम करायचें वांचेल.'

निबंधलेखक श्री० जनार्दन सखाराम गाडगीळ यांना स्वतःला लक्षात घेण्याजोगी 'लिहिण्याची शैली' नाही. परंतु त्यांनी तत्संबंधी केलेला विचार मात्र तो ज्या काळात झाला आहे त्या काळाच्या मानाने निश्चित लक्षात घेण्याजोगा आहे. श्री. गाडगीळ यांच्या मनावर त्या काळात शाळेच्या वरील वर्गातून आणि कॉलेजमध्ये rhetorics ह्या विषयाचे जे इंग्रजी ग्रंथाधारे अध्ययन होत होते त्याचे संस्कार झालेले स्पष्ट दिसत असले तरी त्यांनी 'लिहिण्याच्या शैली'च्या संबंधात व्यक्त केलेल्या विचारात तत्कालीन मराठी वाङ्मयविचाराच्या दृष्टीने निःसंशय महत्त्वपूर्ण ठरणारा असा भाग आहे. ज्या काळात शैलीसंबंधीच्या विचारात अलंकरणाच्या कल्पनेला–शब्दालंकार व अर्थालंकार यांना विलक्षण महत्त्व होते त्या काळात उत्तम शैलीची लक्षणे सांगतांना त्यात पदलालित्य आणि वाक्यलालित्य यांच्या बरोबरीनेच–किंबहुना त्यांच्यापेक्षा अधिकच विचारगांभीर्य आणि विचारलालित्य यांना महत्त्व देण्यात जनार्दन सखाराम गाडगीळ यांनी खरोखरच मराठी वाङ्मयविचार योग्य मार्गावर आणण्यास फार मोठी मदत केली आहे. उत्तम लेखनात विचारशक्ती आणि कल्पनाशक्ती यांचे ऐक्य साधलेले असते हा सदर लेखात

गाडगीळ यांनी मांडलेला विचार ते अंगीकारीत असलेल्या नव्या दृष्टिकोणाचा निदर्शक आहे. मराठी गद्याचे वैभव वाढविणारे लेखक गाडगीळांच्या ह्या लेखानंतरच मराठीत मुख्यत्वेकरून उदयास आलेले असले तरी गद्यलेखनाच्या शैलीचे मोल कोणत्या गुणविशेषांवरून जोखले जावयास हवे याची बरीचशी अचूक सूचना गाडगिळांच्या सदर निबंधातून अगोदरच देण्यात आली होती असे दिसते. गाडगिळांनी शैलीविषयक विचाराला लावलेले हे इष्ट व निरोगी वळण पुढे किती दिवस टिकले हा प्रश्नच आहे.

'मराठी ज्ञानप्रसारकां'तील काही ग्रंथपरीक्षणे आणि लेख यांच्या आधारे १८५० ते १८६६ ह्या काळात झालेल्या वाङ्मयविचाराचा बराचसा तपशीलवार परिचय वरील परिच्छेदात करून देण्यात आला आहे. 'विविधज्ञानविस्तार' (१८६७) आणि 'निबंधमाला' (१८७४) यांचा उदय होण्याच्या अगोदरच्या काळातील हा वाङ्मयविचार आहे हे लक्षात घेतल्यास त्याचे महत्त्व पटावे. श्री. काशीनाथ बाळकृष्ण मराठे यांचा 'नावेल आणि नाटक यांवरील निबंध,' १८७२ मध्ये लिहिला गेला. 'मराठी ज्ञानप्रसारकां'तील वाङ्मयविचार हा त्यापूर्वीचा आहे. मुंबई विद्यापीठाची स्थापना होण्यापूर्वीच (१८५७ पूर्वी) ह्या वाङ्मयविचारास प्रारंभ झाला असून तेव्हापासून तो विद्यापीठ स्थापन झाल्यानंतरच्या दहा वर्षांपर्यंतचा हा वाङ्मयविचार आहे. त्यावर पौरस्त्य वाङ्मयविचारापेक्षा पाश्चात्य वाङ्मयविचाराचीच अधिक छाप आहे. कादंबरी व नाटक ह्यांसारख्या वाङ्मयप्रकाराकडे पाहण्याची त्यातून व्यक्त होणारी दृष्टी पौरस्त्य नाही, तिच्यावर झालेले इंग्रजी वाङ्मयविचारांचे संस्कार सहजपणे लक्षात येण्याजोगे आहेत. 'रत्नप्रभा' ही कादंबरी आणि 'जयपाळ' हे नाटक यांची वर एके ठिकाणी विस्ताराने उल्लेखिलेली ग्रंथपरीक्षणे ह्या म्हणण्याची साक्ष पटवितात. ह्या दोन्ही परीक्षणांची पद्धती पाश्चात्य आहे. त्यांमधून ज्या गोष्टी विचारात घेतल्या गेल्या आहेत त्या रस किंवा नायक आणि नायिका यांचे उदात्तत्व ह्यांसारख्या नव्हेत तर सदर कादंबरीचा किंवा नाटकाचा आपल्या मनावर उमटणारा ठसा, त्याची एकात्मता, ज्या घटनांनी सदर कादंबरी वा नाटक यांचे कथानक सिद्ध होते त्या घटनांची संभाव्यता, ज्या प्रमुख व्यक्तींच्या संदर्भात ह्या घटना घडताना आढळतात त्या व्यक्तींच्या चित्रणात आढळणारी अन्तर्गत सुसंगती इत्यादी होत. ह्या ग्रंथपरीक्षणकारांचा दृष्टिकोण नीतिवादी आहे. ते स्वाभाविकच नाटक-कादंबरीच्या कथानकांचा नीतिवादी दृष्टिकोणांतून विचार

करीत आहेत; परंतु ते तेथेच थांबत नाहीत. एखाद्या कादंबरीची किंवा नाटकाची परीक्षा म्हणजे नेमकी कशाकशाची परीक्षा, ह्या परीक्षेत त्यांची कोणकोणती अंगे लक्षात घेतली पाहिजेत व त्यांची चिकित्सा कोणत्या मूल्यांच्या आधारे केली पाहिजे ह्यासंबंधीची बरीच सुबुद्ध समज ते व्यक्त करिताना दिसतात. त्यांच्यासमोर असलेल्या नाटककादंबऱ्या कल्पनारम्य आहेत. त्यात वास्तवापेक्षा अद्भुताला आणि संभाव्य घटनांपेक्षा योगायोगालाच अधिक महत्त्वाचे स्थान दिले जात आहे, परंतु असे असूनही त्यांचे परीक्षण करिताना परीक्षणकार जो दृष्टिकोण स्वीकारीत आहेत त्यात त्यांना नकळत वास्तववादी मूल्ये डोकावताना दिसत आहेत. ही निःसंशय इंग्रजी वाङ्मय विचाराच्या संपर्काने हळूहळू उदयास येऊ पाहत असलेल्या नव्या वाङ्मयदृष्टीची चाहूल आहे.

कादंबरी व नाटक ह्यांसारख्या महत्त्वाच्या वाङ्मयप्रकरात निर्माण होणाऱ्या कृतींची थोड्याफार नव्या दृष्टिकोणामधून परीक्षा करण्याची प्रवृत्ती जशी ‘मराठी ज्ञानप्रसारकां’त दिसून येते त्याचप्रमाणे कविता म्हणजे काय ह्यासारखा प्रश्न उपस्थित करून त्याचे उत्तर जी प्रकृतीने सर्वस्वी भिन्न अशी इंग्रजी कविता शाळाकॉलेजांमधून नव्याने वाचनात येऊ लागली होती तिच्या संदर्भात शोधण्याचीही वृत्ती दिसून येते. ‘मराठी ज्ञानप्रसारक’ ‘यशोदा पांडुरंगी’ सारख्या केकावलीवरील टीकाग्रंथाचे अत्यंत चिकित्सकपणे केलेले शुद्धीकरण जसे प्रसिद्ध करिताना दिसते तसेच कवितेत महत्त्व कशाला, प्रासयुक्त रचनेला की ‘अर्थाला’, ज्यामुळे कवितेत सामर्थ्य अवतरते असा ‘अर्थ’ कोणता, हा ‘अर्थ’ कवितेत अवतरण्यासाठी कवीची वृत्ती कशी हवी इत्यादी नव्या काव्य-दृष्टीची सूचना देणारे प्रश्नहि वेगवेगळ्या संदर्भात उपस्थित करू पाहते. ‘चंद्रहासनामक राजपुत्राचा इतिहास’ ह्या प्रदीर्घ बोधकथेतील चंद्रहास आणि विश्वावसू यांचा ‘पद्यात्मक कवितेसंबंधीचा संवाद’ ह्या दृष्टीने किती लक्षात घेण्याजोगा आहे याची कल्पना ह्या लेखात इतरत्र दिलेला त्याचा सारांश वाचल्यावर सहज येऊ शकते. विश्वावसूने ह्या संवादातून रेखाटलेले कवीचे चित्र तत्कालीन मराठी काव्यविचाराच्या संदर्भात न्याहाळल्यास त्याची अभिनवता जाणवल्याखेरीज राहत नाही. आपण कवी आहोत याची जाणीव होताच आपण काय केले हे सांगताना “अगदी क्षुल्लक खडकापासून रत्नखचित राजवाड्यापावेतो एकसारखेंच लक्ष लावून मी पाहिलें. कधीं कधीं नदीचीं वाकें

असतील तिकडेच जावें, कधींकधीं मेघांची गति पाहात असावें. कारण कवीला कोणतेही निरुपयोगी नाहीं. यावत् सुंदर, मनोहर व भयंकर या सर्वांची त्याला उत्तम रीतीची माहिती पाहिजे" असे जे विश्वावसू म्हणतो आणि खऱ्या कवीच्या वृत्तीचे, त्याच्याकडून अपेक्षित असलेल्या कार्यांचे आणि त्याच्या सामर्थ्याचे जे चित्र रेखाटतो ते पाहात असता त्यात इंग्रजी रोमँटिक कवींच्या विचारांच्या छटा आपणांस ठिकठिकाणी उमटलेल्या स्पष्ट दिसतात, असे वाटत नाही काय?

ह्याच दृष्टीने जनार्दन सखाराम गाडगीळ यांच्या 'लिहिण्याची शैली' ह्या निबंधात व्यक्त होणाऱ्या विचारसरणीत आपणांस रीतीसंबंधीच्या संस्कृत परंपरागत विचारांपासून शक्य तो अलिप्त राहण्याची वृत्ती दिसून येते. ह्या सबंध निबंधात कल्पनाशक्ती व तिचे कार्य लक्षात घेऊन शैलीचा विचार करण्याची जी प्रवृत्ती दिसून येते ती निखालस सर्वस्वी नव्या वाङ्मयीन दृष्टिकोणाची निदर्शक आहे. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी इंग्लंडमधील रोमँटिक चळवळीचा एक प्रभावी पुरस्कर्ता कोलरिज याने आपल्या टीकालेखनातून कल्पनाशक्तीच्या कार्यांचे स्वरूप सविस्तरपणे स्पष्ट केले, आणि 'रोमँटिसिझम' ह्या कल्पनेत येथून पुढे कल्पनाशक्तीच्या विलासाला सतत विचारवंतांकडून महत्त्वाचे स्थान देण्यात आले. 'लिहिण्याची शैली' ह्या निबंधाचे लेखक श्री. गाडगीळ यांच्या अभ्यासात कोणते इंग्रजी टीकाग्रंथ आले होते हे निश्चित सांगता येणे कठीण असले तरी एवढे खरे की कोणत्याही वाङ्मयाच्या अंगांचा विचार हा त्या अंगांशी संबद्ध असलेल्या कल्पनाशक्तीच्या कार्याच्या विचाराशिवाय करणे कठीण आहे ही नवी जाणीव ते आपल्या निबंधातून निःसंशय व्यक्त करिताना दिसतात. शैलीसंबंधीच्या विचारात ते पदलालित्य आणि वाक्यलालित्य ह्यांच्या बरोबरीने 'विचारलालित्या'ला स्थान देताना दिसतात हेही ज्या नव्या वाङ्मयीन दृष्टीचा ते अवलंब करताना आढळतात त्या दृष्टीचे सूचक आहे. ते 'पदलालित्य' आणि 'वाक्यलालित्य' ह्या शब्दांबरोबर 'विचारलालित्य' हा नवा शब्द बनवतात हेच त्यांच्या नव्या दृष्टिकोणाचे एक गमक आहे. 'लिहिण्याच्या शैली'चा विचार करीत असता चित्र म्हणजे काय, आपण चित्र पाहतो म्हणजे नेमके काय करितो, चित्र काय साधण्याचा प्रयत्न करीत असते इत्यादी प्रश्न उपस्थित करून चित्रकार आणि लेखक यांच्या कार्यपद्धतीतील साधर्म्य शोधणे, त्यांची समान अंगे लक्षात घेणे हे खरोखरच कशाचे द्योतक

आहे ? मराठीत अशा पद्धतीनें एखाद्या वाङ्मयीन प्रश्नाचा विचार करण्याचा प्रयत्न ह्या पूर्वी कोणी केलेला आढळतो काय ? वाङ्मयकलेशी संबद्ध असणाऱ्या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी चित्रासारख्या ललितकलेकडे वळणे व तिची साक्ष काढणे हे वाङ्मयकलेच्या प्रकृतीसंबंधी हळूहळू निर्माण होणाऱ्या नवीन जाणिवेचे निदर्शक आहे.

'मराठी ज्ञानप्रसारकां'तील वाङ्मयविचार ह्याप्रमाणे हळूहळू परंतु निश्चितपणे नव्या दिशेने पावले टाकीत होता. 'ज्ञानप्रसारका'नंतर आलेल्या 'विविधज्ञानविस्तारा'ने आणि 'निबंधमाले'ने तो कोणकोणत्या बाबतीत आणि कोणत्या दिशेने पुढे नेला हे पाहणे उब्दोधक आहे. एवढे खरे की, ग्रंथपरीक्षण आणि वाङ्मयीन प्रश्नांचा तात्त्विक विचार ह्या उभयविध क्षेत्रात 'मराठी ज्ञानप्रसारका'ने निश्चित लक्षणीय कार्य केले आहे. ग्रंथाचे परीक्षण ही केवढी जबाबदारीची बाब आहे, तेवढ्यासाठी अभ्यासाची आणि परिश्रमांची आवश्यकता आहे हे ज्ञानप्रसारकाने ग्रंथांची अत्यंत साक्षेपी वृत्तीने परीक्षणे करून दाखवून दिले. त्याने केलेल्या 'जयपाळ' आणि 'रत्नप्रभा' ह्या ललित ग्रंथांच्या परीक्षणांबरोबरच 'यशोदा पांडुरंगी,' 'डाक्टर विलसन यांनीं केलेली इंग्रजी आणि मराठी वाक्यावलि' आणि 'कविचरित्र' ह्या पुस्तकांची परीक्षणेही ह्या दृष्टीने लक्षात घेण्याजोगी आहेत.

परिशिष्ट पहिले

# मराठीतील प्रारंभीची रहस्यकथा

मराठीतील पहिली रहस्यकथा केव्हा लिहिली गेली असेल ती असो; परंतु एवढे खरे की उपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभेने चालविलेल्या 'मराठी ज्ञानप्रसारक, ह्या मासिकाच्या १८६२ सालांतील मेपासून डिसेंबरपर्यंतच्या एकंदर नऊ अंकांत आपणांस मराठींतील पहिल्या चार रहस्यकथा आढळतात.' 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या संपादकीय धोरणानुसार ह्या कथांच्या लेखकांची नावे अर्थात कोठेच जाहीर करण्यात आलेली नाहीत; परंतु त्या चारीही कथा एकाच लेखकाने लिहिलेल्या असाव्यात असे मानायला भरपूर जागा आहे. ह्या कथांची नावे 'छायेची साक्ष', 'पुत्रशोक', 'हरवलेले रत्न', आणि 'धाकटा कारकून' ही असून त्या अनुक्रमे १८६२ सालच्या 'मराठी ज्ञानप्रसारकाच्या' मे, जून, सप्टेंबर व डिसेंबर ह्या अंकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांतील 'पुत्रशोक' ही कथा दोन भागातून प्रसिद्ध झाली असून 'हरवलेले रत्न' ह्या कथेचे एकंदर तीन भाग आहेत. स्वाभाविकच ह्या कथांनी 'मराठी ज्ञानप्रसारका'ची बरीच पाने व्यापिली असून त्यांतील काही दोन तीन अंकांतून पुऱ्या झाल्या आहेत.

ह्या चारही कथांची कथनशैली आणि त्यांतील भाषेच्या लकबा ह्यांत अगदी सहज लक्षात येण्याजोगा सारखेपणा असल्यामुळे त्या एकाच लेखकाने लिहिलेल्या असाव्यात हे मानायला जशी जागा आहे तशीच आणखी एका

गोष्टीवरून ह्या समजुतीला बळकटी यावी अशी परिस्थिती आहे. ती गोष्ट म्हणजे अशी की ह्या चार कथांपैकी 'छायेची साक्ष' ही पहिली कथा लिहिताना आपण एका वेगळ्या प्रकारची कथा लिहीत आहोत याची कथा लेखकाला जाणीव असल्याचे दिसत नाही. तो आपल्या कथेला 'छायेची साक्ष' एवढेच नाव देताना आढळतो; परंतु ह्या कथेनंतर पुढल्याच महिन्यात 'पुत्रशोक' ह्या नावाची जी दुसरी कथा तो प्रसिद्ध करितो त्या कथेच्या शीर्षकाखाली आपणांस कंसात 'एक नवल' हे शब्द योजिलेले आढळतात. 'छायेची साक्ष' ही कथा प्रसिद्ध झाल्यावर ही कथा इतर सर्वसामान्य कथांपेक्षा प्रकृतीने वेगळी आहे, ती एक 'नवलकथा' आहे ह्याची सूक्ष्म का होईना, पण जाणीव कथालेखकाला झालेली असावी आणि म्हणूनच तशाच प्रकारच्या आपल्या हातून लिहिल्या गेलेल्या 'पुत्रशोक' ह्या दुसऱ्या कथेच्या शीर्षकाखाली 'एक नवल' हे शब्द लिहावेसे त्याला वाटले असावे. आपण लिहीत आहोत ह्या 'नवल' कथा आहेत आणि म्हणूनच त्यांना वेगळ्या नावाने संबोधणे अत्यावश्यक आहे हे सदर कथालेखकाच्या, 'पुत्रशोक' ही दुसरी कथा लिहिताच व प्रसिद्ध होताच पूर्णपणे लक्षांत आले असले पाहिजे; कारण 'पुत्रशोक'नंतर तो जी कथा लिहिताना दिसतो व जी 'मराठी ज्ञान-प्रसारका'च्या सप्टेंबर १८६२ च्या अंकात प्रसिद्ध होते त्या कथेस तो केवळ 'हरवलेलें रत्न (एक नवल)' असे न संबोधता 'हरवलेलें रत्न (नवल तिसरें)' ह्या नावानेच एकदम संबोधताना आढळतो. आपल्या पहिल्या दोन कथांना अनुक्रमे 'नवल पहिलें', 'नवल दुसरें' अशी उपनामे न देता एकदम तिसऱ्या कथेला मात्र 'नवल तिसरें' असें उपनाम देण्यात लेखकाच्या मनाने दरम्यानच्या काळात आपण लिहीत असलेल्या आगळ्या कथांना कोणत्या नावाने संबोधावयाचे ह्यासंबंधात घेतलेला निर्णय निश्चित दिसून येतो. स्वाभाविकच लेखक त्यानंतर डिसेंबरच्या अंकामध्ये प्रसिद्ध होत असलेल्या आपल्या 'धाकटा कारकून' या कथेला 'नवल चौथें' याच नावाने संबोधितो ह्यात आश्चर्य नाही.

या 'नवल' कथांच्या लेखनाची स्फूर्ती सदर कथालेखकाने त्या कालातील इंग्रजी नियतकालिकातील रहस्यकथांवरून घेतलेली असणे शक्य आहे; परंतु १८६० साली व १८६० च्या अगोदर इंग्रजीमध्ये नाव घेण्याजोगे रहस्यकथा-लेखन कितपत होत होते याबद्दल संशय आहे. कॉनन डॉईलच्या शेरलॉक

कारण फिर्यादीची किंवा आरोपीची वकिली करणे हा त्याचा धंदा आहे, त्याचप्रमाणे ज्या गुन्ह्याच्या संदर्भात तो ही वकिली करतो, त्या गुन्ह्याचा तलास लावणे, त्यात दडलेले रहस्य शोधून काढणे हा त्याच्या व्यवसायाचा मुख्य भाग आहे. परंतु ह्या पहिल्या मराठी रहस्यकथांतून हा रहस्यशोध घेऊ पाहणारे वकील आपले काम फार भीतभीतपणे करताना आढळतात. 'भीत-भीतपणे' असे म्हटले याचे कारण असे की, ते ह्या कामात वाकबगार नाहीत व आपण वाकबगार नाही ह्याची त्यांना जाणीव आहे असे दिसून येते. ज्या रहस्याचा ते शोध लावू पाहत असतात त्याचा शोध हा त्यांच्या आवाक्या-बाहेरचा आहे, ह्याची तुम्हाआम्हा वाचकांनाही जाणीव व्हावी असेच चित्रण सदर कथांमध्ये झाले आहे; म्हणजे एका दृष्टीने पुढच्या रहस्यकथांतून येणारे शेरलॉक होम्स आणि त्याचे शिष्योत्तम हे एका टोकाला व वकील दुसऱ्या टोकाला असा देखावा दिसतो. शेरलॉक होम्स किंवा त्याचे आजच्या गुप्तपोलिसी कथेतील चतुर वंशज ह्यांच्या ठिकाणी दिसून येत असलेल्या आत्मविश्वासाचा संपूर्ण अभाव सदर 'शोधक' वकिलांमध्ये आढळतो. प्रत्यक्ष कथांतून रहस्यांचा शोध लावण्याचे काम त्यांजवर सोपविलेले दिसत असले तरी शेवटी रहस्यांचा शोध लागतो तो त्यांच्या कर्तृत्वामुळे नव्हे तर दैवाने त्यांना ऐन वेळी मदतीचा भरभक्कम हात दिल्यामुळे होय हेच आपल्या लक्षात येते; व म्हणून ह्या मराठीतील पहिल्या पहिल्या रहस्यकथांमध्ये गुप्तपोलिसाचे काम आरोपीच्या वकिलांकडे आलेले आहे असे विधान करण्याऐवजी दैवाचे विलक्षण पाठबळ असलेल्या काही कर्तृत्वशून्य परंतु सत्प्रवृत्त वकिलांकडे आलेले आहे अशी मुरड त्या विधानास घालावीशी वाटते.

रहस्याचा शोध लावण्याचे काम ह्या कथांमध्ये अशा रीतीने वकिलांकडे सोपविलेले असल्यामुळे ह्या प्रत्येक कथेतील शेवटचा समरप्रसंग कोणता असेल ह्याची कल्पना सहज करिता येण्यासारखी आहे : हा प्रसंग म्हणजे न्यायालयातील खटल्याचा. ह्या चारीही कथांच्या शेवटी न्यायालयाचा देखावा आहे. प्रत्येक रहस्यामागील कथा शेवटी न्यायासनासमोर उकलली जात आहे व गुन्हेगार कोण ह्याचा तलास लागून त्याला यथायोग्य शिक्षा होत आहे; परंतु न्यायालयामधील न्यायदानाचे सदर कथांमधील चित्रण आजच्या कथांतील किंवा चित्रपटांतील 'कोर्टसीन' पेक्षा वेगळे आहे. येथे न्यायाधीशाच्या आसना-वर बसलेली व्यक्ती न्यायनिष्ठुर नाही; तिच्या ठिकाणी न्यायनिष्ठुरतेपेक्षा

कारण फिर्यादीची किंवा आरोपीची वकिली करणे हा त्याचा धंदा आहे, त्याचप्रमाणे ज्या गुन्ह्याच्या संदर्भात तो ही वकिली करतो, त्या गुन्ह्याचा तलास लावणे, त्यात दडलेले रहस्य शोधून काढणे हा त्याच्या व्यवसायाचा मुख्य भाग आहे. परंतु ह्या पहिल्या मराठी रहस्यकथांतून हा रहस्यशोध घेऊ पाहणारे वकील आपले काम फार भीतभीतपणे करताना आढळतात. 'भीत-भीतपणे' असे म्हटले याचे कारण असे की, ते ह्या कामात वाकबगार नाहीत व आपण वाकबगार नाही ह्याची त्यांना जाणीव आहे असे दिसून येते. ज्या रहस्याचा ते शोध लावू पाहत असतात त्याचा शोध हा त्यांच्या आवाक्या-बाहेरचा आहे, ह्याची तुम्हाआम्हा वाचकांनाही जाणीव व्हावी असेच चित्रण सदर कथांमध्ये झाले आहे; म्हणजे एका दृष्टीने पुढच्या रहस्यकथांतून येणारे शेरलॉक होम्स आणि त्याचे शिष्योत्तम हे एका टोकाला व वकील दुसऱ्या टोकाला असा देखावा दिसतो. शेरलॉक होम्स किंवा त्याचे आजच्या गुप्तपोलिसी कथेतील चतुर वंशज ह्यांच्या ठिकाणी दिसून येत असलेल्या आत्मविश्वासाचा संपूर्ण अभाव सदर 'शोधक' वकिलांमध्ये आढळतो. प्रत्यक्ष कथांतून रहस्यांचा शोध लावण्याचे काम त्यांजवर सोपविलेले दिसत असले तरी शेवटी रहस्यांचा शोध लागतो तो त्यांच्या कर्तृत्वामुळे नव्हे तर दैवाने त्यांना ऐन वेळी मदतीचा भरभक्कम हात दिल्यामुळे होय हेच आपल्या लक्षात येते; व म्हणून ह्या मराठीतील पहिल्या पहिल्या रहस्यकथांमध्ये गुप्तपोलिसाचे काम आरोपीच्या वकिलांकडे आलेले आहे असे विधान करण्याऐवजी दैवाचे विलक्षण पाठबळ असलेल्या काही कर्तृत्वशून्य परंतु सत्प्रवृत्त वकिलांकडे आलेले आहे अशी मुरड त्या विधानास घालावीशी वाटते.

रहस्याचा शोध लावण्याचे काम ह्या कथांमध्ये अशा रीतीने वकिलांकडे सोपविलेले असल्यामुळे ह्या प्रत्येक कथेतील शेवटचा समरप्रसंग कोणता असेल ह्याची कल्पना सहज करिता येण्यासारखी आहे : हा प्रसंग म्हणजे न्यायालयातील खटल्याचा. ह्या चारीही कथांच्या शेवटी न्यायालयाचा देखावा आहे. प्रत्येक रहस्यामागील कथा शेवटी न्यायासनासमोर उकलली जात आहे व गुन्हेगार कोण ह्याचा तलास लागून त्याला यथायोग्य शिक्षा होत आहे; परंतु न्यायालयामधील न्यायदानाचे सदर कथांमधील चित्रण आजच्या कथांतील किंवा चित्रपटांतील 'कोर्टसीन' पेक्षा वेगळे आहे. येथे न्यायाधीशाच्या आसना-वर बसलेली व्यक्ती न्यायनिष्ठुर नाही; तिच्या ठिकाणी न्यायनिष्ठुरतेपेक्षा

मोठ्या कसोशीने व कौशल्याने घेताना दिसतात. रहस्याचा शोध लावण्याच्या बाबतीत ते जो थोडाफार प्रयत्न करिताना दिसतात तो ह्या साक्षीदारांच्या तपासणीत.

'पुत्रशोक' ह्या गोष्टीतील डिटेक्टिव्ह-वकील मात्र आपल्या इतर बांधवांपेक्षा थोडा वेगळा आहे. तोच तेवढा थोडाफार पुढे येणाऱ्या बाबूरावादी डिटेक्टिव्हांचा खऱ्या अर्थाने पूर्वज शोभतो. कारण खटला प्रत्यक्ष न्यायालयात येण्याच्या अगोदर त्याने आपल्या बुद्धिचातुर्याने गुन्ह्याचे धागेदुवे जुळवून रहस्याचा शोध लावण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. ह्यात तो आपल्यापेक्षा अधिक अनुभवी अशा एका वृद्ध वकिलाचा वेळोवेळी सल्ला घेताना दिसतो व त्या दृष्टीनेही त्याचे रहस्याचा शोध लावण्याबाबतचे प्रयत्न विशेष आस्थेवाईक व लक्षणीय वाटतात.

'पुत्रशोक' ही 'छायेची साक्ष' प्रमाणेच दोन बहिणींची कथा आहे; परंतु त्यांतील एक कुटिल व दुर्व्यसनी आहे, आपल्या बापाची मिळकत आपल्या नावे व्हावी म्हणून ती हरतऱ्हेच्या कारवाया करते. आपल्या धाकट्या बहिणीच्या प्रेमप्रकरणात आपण तिला मदत करीत आहोत असा आभास निर्माण करून बापाचे व तिचे वितुष्ट घडवून आणते, खोटीनाटी पत्रे लिहिते; परंतु शेवटी दैववशात धाकटी बहीण तिचा नवरा निवर्तल्यावर आपल्या लहान मुलांसह बापाच्या आश्रयाला आल्यावर तिचे व बापाचे सूत जमून वडील बहिणीची कारस्थाने उघडकीस येतात व बाप आपल्या मिळकतीचें वारसपत्र धाकटीच्या व तिच्या मुलाच्या नावे करून टाकतो. स्वाभाविकच वडील बहिणीचा क्रोध अनावर होतो व ती बापाच्या मृत्यूच्या वेळीं एका गुप्त दरवाजाने आपल्या धाकट्या बहिणीच्या खोलीत प्रवेश करून तिचे लहान मूल व वारसपत्र ही पळवून वाड्यामागील विहिरीत नेऊन टाकते. खोलीला कुलूप असता खोलीतील मूल व वारसपत्र ही नाहीशी कशी झाली ह्या रहस्याचा शोध वकिलसाहेबांना लावायचा असतो व ही गोष्ट खोलीला गुप्त दरवाजा असल्याशिवाय अशक्य आहे हे त्यांच्या लक्षात येते. तेवढ्यात धाकट्या बहिणीकडून वकीलसाहेबांना असेही कळते की काही वर्षांपूर्वी एकदा खोलीला आतून कडी लावलेली असताना तिची वडील बहीण अगदी अचानकपणे खोलीत आलेली तिच्या नजरेस पडलेली होती व मागच्या सज्ज्यातून जाणाऱ्या जिन्याने ती परत गेली होती; वकीलसाहेबांना

करण्यानें, अथवा नेत्र किंवा हस्तसंकेत करून या खटल्यास मजबुती आणण्याविषयीं यत्न केला असेल तर मला ईश्वर पाहून घेईल" इतका पापभीरू व सहृदय सरकारी वकील कोणत्या आरोपीला कधी मिळाला असेल? परंतु ह्या कथांतील सर्वच फौजदारी खटल्यांतील सगळयाच आरोपींना असेच त्यांजकडे सहानुभूतीने बघणारे सरकारी वकील मिळाले आहेत. जेथे सगळे वकील आणि न्यायाधीश आरोपीबद्दल सहानुभूती बाळगणारे तेथे खटला ऐकण्यासाठी नेमलेले पंचही तसेच असणार हे काय सांगायला हवे? इतर न्यायालयांतील पंच कितीही निःपक्षपातीपणे व न्यायनिष्ठुरपणे वागत असोत, या कथांतील पंच मात्र आपल्या उद्गारांवरून, हावभावांवरून, हास्यावरून वा शोकावेगांवरून आपणांस निरपराधी आरोपीबद्दल किती सहानुभूती वाटत आहे हे वेळोवेळी एकसारखे व्यक्त केल्याशिवाय राहत नाहीत. तेव्हा इतके पापभीरू सरकारी वकील, इतके प्रेमळ न्यायाधीश आणि इतके भावनाप्रधान व कनवाळू पंच कोणत्याही रहस्यकथेतील आरोपीला कधीही मिळाले नसतील असे मला वाटते व म्हणूनच एवढे न्यायालयांतील सर्व वातावरण आपल्या अशिलाला अनुकूल असलेले दिसत असता आरोपीच्या वकिलांचे पाय ह्या सर्वच कथांतून लटपटताना का दिसावेत ह्याचे सकृद्दर्शनी फार आश्चर्य वाटते.

सकृद्दर्शनी असे म्हटले याचे कारण असे की, थोड्या विचाराअंती हे आश्चर्य इतकेसे वाटत नाही. डिटेक्टिव्हाचे काम अंगावर घेऊ पाहणाऱ्या एका 'बुद्धिमान' व्यक्तीचे देखील हातपाय लटपटत आहेत हे पाहून वाचकाला एका निरपराध व्यक्तीवर गुदरलेल्या प्रसंगाचे एकंदर गांभीर्य लक्षात यावे व आता या दुर्दैवी निरपराध आरोपीचे काय होणार ह्याबद्दल त्याला सकारण काळजी वाटावी असाच तेथे लेखकाचा हेतू आहे. मला तर वाटते, एवढ्या आधारावरच रहस्याच्या शोधासंबंधीची म्हणजेच खटल्याच्या निकालासंबंधीची उत्कंठा आपल्या वाचकांच्या अंतःकरणामध्ये टिकविण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. प्रत्यक्षपणें ह्या गुन्ह्याचा शोध लावू पाहणाऱ्या वकिलाच्या हातून तो शोध लावण्याचा योग क्वचितच येतो हे वर एके ठिकाणी स्पष्ट केलेच आहे. मौज वाटते ती ह्याची की, अशा प्रकारे एका दृष्टीने निष्क्रिय ठरणाऱ्या ह्या शोधक वकिलाला सर्वच कथांतून मात्र प्रारंभापासून एवढे महत्त्व देताना लेखक दिसतो की आपल्यासारखा वाचक स्वतःला नकळत त्याच्याकडून मग बुद्धिचातुर्याची अपेक्षा करू लागतो, त्याच्या हालचालींकडे साभिप्राय पाहू लागतो,

त्याचे बोलणे व त्याची प्रश्नोत्तरे कान लावून ऐकू लागतो आणि शेवटी एवढे झाल्यावर जेव्हा हा बार फुसकाच आहे हे आपल्या लक्षात येते तेव्हा आपल्याला आपली अगदीच फसगत झाल्यासारखी वाटते. रहस्याचा शोध, खरे म्हणजे, प्रत्येक कथेत लागतो तो जवळजवळ योगायोगाने–निरपराधी आरोपीच्या मदतीला न्यायाधीश, सरकारी वकील, पंच व कोर्टातील प्रेक्षक ह्या सर्वांबरोबर जणू प्रत्येक वेळी दैवही जोराने धावून येते व म्हणूनच केवळ रहस्याचा शोध लागून सुष्टाचा जय होतो व दुष्टास शासन मिळते.

'छायेची साक्ष' ही पहिलीच कथा घ्या. ही खरे म्हणजे दोन बहिणींची कथा आहे : त्यांतील एक विधवा असून दुसरी कुमारिका आहे; ह्या दोघी अनाथ मुली सिंहलद्वीपाहून हिंदुस्थानात आपल्या चुलत्याच्या आश्रयार्थ आलेल्या आहेत व गावी बैलगाडीतून जात असताना वादळामुळे रस्ता चुकून एका धर्मशाळेत मुक्कामाला राहिल्या असताना त्यांतील वडिलीच्या लहान मुलाचा रात्री खून होत आहे. तो खून ज्या सुरीने होतो ती सुरी, प्रवासात असताना धाकटीने कोलंबो येथे विकत घेतलेलीच सुरी निघाल्यामुळे व काही अन्य पुराव्यांवरून तो खून आपल्या काकाच्या मिळकतीला भागीदार नसावा ह्या दुष्ट हेतूने धाकट्या बहिणीने केला असा तिजवर आरोप आहे व ती निरपराध आहे अशी तिच्या वडील बहिणीची, तिच्या वकिलाची, न्यायाधीशाची व सरकारी वकील आणि पंच ह्या सर्वांचीच मनोदेवता त्यांना साक्ष देत आहे; परंतु प्रत्यक्ष खुनी सापडायचा कसा व ह्या निरपराध मुलीवरील आरोप नाशाबीत व्हावयाचे कसे हा प्रश्न आहे. प्रत्यक्ष खुनी शोधून काढण्याचा एकच अंधुक मार्ग आहे. खून होताच त्या लहान मुलाने मारलेल्या किंकाळीने जाग्या झालेल्या मुलाच्या आईने खुनी माणसाची सावली दिव्याच्या प्रकाशात भिंतीवर पाहिलेली आहे व ती सावली आपल्या धाकट्या बहिणीची नव्हती ह्याविषयी तिला पूर्ण खात्री आहे. तेव्हा केवळ ह्या सावलीच्या आधाराने खुनी माणसाचा तपास लागावयाचा आहे व आरोपीचा वकील तो कसा लावणार ह्याकडे तुम्हाआम्हा सर्व वाचकांचे अर्थात लक्ष आहे.

मौज अशी की शेवटी हा तपास लागतो तो निव्वळ दैवयोगाने. खून झालेल्या रात्री त्या धर्मशाळेत असलेल्या सर्वांनाच पोलिसांनी संशयावरून पकडलेले असते व खटल्यात त्यांच्या साक्षी व्हावयाच्या असतात; परंतु खटल्यास प्रारंभ होताच त्यांतील एक साक्षीदार नाहीसा झाल्याचे आढळून

येते. खटला सुरू होतो, त्या निरपराध मुलीवर आरोप जवळजवळ सिद्ध होण्याची वेळ येते; एवढ्यात प्रचंड वादळ होऊन कोर्टात अंधार होतो; त्या काळोखात न्यायालयाचे कामकाज पुढे चालेनासे होते व म्हणून न्यायाधीश दिव्यांची व्यवस्था करण्याची आपल्या हवालदारास आज्ञा करितात. हवालदार गडबडीने एक मशाल घेऊन कोर्टरूममध्ये प्रवेश करिताच कोर्टाच्या भिंतीवर पडलेल्या एका सावलीकडे लक्ष जाऊन 'हीच ती छाया' अशा प्रकारचे उद्गार खून झालेल्या मुलाची आई एकाएकी काढताना सर्वांना दिसते. तात्काळ ती ज्याची सावली असते त्याला गिरफदार करण्यात येते; हाच तो खटला चालू होताच एकाएकी नाहीसा झालेला, दरम्यान न्यायालयाच्याच एका कोपऱ्यात दडून बसलेला व आता अंधाराचा फायदा घेऊन पळून जाण्याचा प्रयत्न करीत असलेला वहिमी साक्षीदार असतो. मुलींच्या चुलत्याचा तो घरातून हुसकून दिलेला मवाली मुलगा असतो व आपल्या मिळकतीचे वारसपत्र त्या तान्ह्या मुलाच्या नावाने करून दिल्यास आपण त्या मिळकतीस मुकू ह्या विचाराने त्या लहान मुलाचा त्याने जवळपासच्या सामानात सापडलेल्या सुरीने खून केलेला असतो हे उघडकीस येते व एका निरपराधी आरोपीची मुक्तता होऊन खऱ्या गुन्हेगारास शिक्षा होते व खटला संपतो. शेवटी आपण कौतुक करितो ते परमेश्वराच्या लीलेचे, आरोपीच्या वकिलाचे नव्हे. मधल्या काळात आपण केव्हा तरी ह्या 'चतुर' वकिलाला संपूर्णपणे विसरून गेलेले असतो. ह्या एका कथेतील रहस्यस्फोटाची हकीकत थोड्या विस्ताराने सांगितली ती एवढ्याच साठी की, मराठीतील ह्या सर्वच पहिल्यावहिल्या रहस्यकथांतील रहस्यशोधाचे स्वरूप कसे आहे ते आजच्या वाचकांच्या लक्षात यावे. 'पुत्रशोक', 'हरवलेले रत्न', 'धाकटा कारकून' ह्या प्रत्येकातील गुन्ह्याचे स्वरूप वेगवेगळे असले व म्हणूनच त्या प्रत्येकातील रहस्याचा शोध थोड्या वेगवेगळ्या पद्धतींनी लागत असला तरी तो लागण्यास वकिलाच्या बुद्धिचातुर्यापेक्षा परमेश्वरी योगायोगच अधिक कारण झाला आहे हेच प्रत्येक वेळीं जाणवल्याखेरीज राहत नाही.

आता ह्या रहस्यकथांमध्ये रहस्योद्भव कुतूहलाच्याबरोबर एकदोन ठिकाणी थोडे अन्य प्रकारचे कुतूहल वाचकांच्या मनात निर्माण करण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे ही गोष्ट वेगळी. 'हरवलेले रत्न'मध्ये आणि काही प्रमाणात 'धाकटा कारकून'मध्ये चोरीच्या रहस्याबरोबर थोडेसे

'प्रेम'प्रकरणही लेखकाने कथेत आणलेले आहे आणि कथेचे स्वारस्य वाढविण्याचा प्रयत्न केला आहे. 'हरवलेले रत्न' ह्या कथेमध्ये ज्या मुलीवर जवाहिऱ्याकडील एक रत्न चोरल्याचा आळ येतो आहे त्या मुलीचा प्रियकरच शेवटी त्या मुलीची सुटका—अर्थात योगायोगाने करीत आहे : या कथेतील शेवटचा प्रवेश विशेष नाट्यात्म आहे. ह्या निरपराध मुलीवर चोरीचा आळ यावा या हेतूने तिच्या खोलीतील फुलदाणीत ज्या दुष्ट बाईने हे 'हरवलेले रत्न' टाकलेले असते तिच्याच दोन लहान मुलांनी तिचे हे कृत्य लपून पाहिलेले असते व ह्या मुलांची आपापसातील, आईने फुलदाणीत टाकलेल्या 'लाल गोटी'संबंधीची बोलणी अचानकपणे कानी पडल्यामुळे त्या मुलीचा प्रियकर—त्या दुष्ट बाईचा सावत्र मुलगा—ह्या चिमुकल्या साक्षीदारांना घेऊन खटला संपून त्या निरपराध मुलीला शिक्षा होणार ह्या बेताला न्यायलयात एकदम हजर होतो व खटल्याचा रंग बदलतो. एका दुष्ट बाईविरुद्ध तिचीच अजाण मुले न्यायासनासमोर साक्ष देताना दिसतात आणि खटल्याचा शेवट होतो : दुष्टाला शिक्षा होऊन केवळ सुष्टाचा जयच होत नाही तर परस्परांवर प्रेम करणाऱ्या दोन तरुण जीवांचे मीलन होते व रहस्यकथेचे एका गोड प्रेमकथेत रूपांतर होते.

'धाकटा कारकून'मध्येही प्रेमप्रकरण आहे, परंतु त्याने जरा वेगळे रूप घेतले आहे. तेथे गुन्ह्याच्या मुळाशी मत्सर आहे—प्रेमोद्भुत मत्सर आहे. आपण ज्या मुलीवर प्रेम करीत आहोत ती आपल्या पेढीच्या मालकाची मुलगी आपल्याऐवजी आपल्या सहकाऱ्यावर विशेष खूष आहे हे लक्षात येताच त्याला बदनाम करण्यासाठी एक कारस्थान रचून त्याजवर हुंड्यांची अफरातफर करण्याचा आळ एक 'वडील' कारकून करतो; परंतु त्याच्या दुर्दैवाने रात्रीच्या वेळीं पेढीत शिरून कृष्णकारस्थान करीत असताना त्याला ज्याने पाहिलेले असते व ज्याच्या डोक्यावर प्रचंड घाव घालून त्याला यमसदनाला पाठविले आहे अशा भ्रमात तो असतो तोच गृहस्थ (मृत्युमुखी न पडता) हॉस्पिटलमधून बरा होऊन जेव्हा अगदी ऐनवेळी कोर्टात हजर होतो तेव्हा अर्थात खटल्याचा रंग पालटतो; परंतु 'हरवलेले रत्न'प्रमाणे ह्या कथेतील हा शेवटचा नाट्यात्म प्रसंग लेखकाने विशेषच नाट्यपूर्ण केला आहे. त्या कथेतल्याप्रमाणेच ह्या कथेतही ह्या महत्त्वाच्या व सर्वस्वी अनपेक्षित साक्षीदाराला घेऊन न्यायालयात प्रवेश कोण करते म्हणाल तर त्या निरपराध 'धाकट्या

कारकुना'वर मनापासून प्रेम करीत असलेली पेढीच्या मालकाची खुद्द मुलगीच. पोर्शियाने अँटोनियोला आपल्या वाक्चातुरीने वाचविण्यापेक्षाही ही घटना अधिक रोमँटिक नाही काय ? आपल्या प्रियकराला चोरीच्या आरोपातून अगदी ऐन वेळीं मुक्त करू शकणारी ही मराठीतील पहिलीच नायिका असावी. या दृष्टीने 'हरवलेले रत्न' मधील आपल्या प्रियेला चोरीच्या आरोपातून मुक्त करू शकणारा प्रियकर आणि 'धाकटा कारकून' मधील आपल्या प्रियकराला अफरातफरीच्या आरोपातून मुक्त करू शकणारी ही प्रेयसी या दोघांना मराठी रहस्यकथांमध्ये (आणि प्रेमकथांमध्येही) महत्त्वाचे स्थान दिले पाहिजे. अर्थात या रहस्य-अधिक-प्रेम-कथा १८६२-६३ सालातील आहेत. तेव्हा त्यांच्या त्या काळातील वाचकांचे या परस्परांच्या मदतीस धावून जाणाऱ्या चक्रवाक-चक्रवाकींचे पुढे काय झाले याबद्दलचे कुतूहल पुरविणे हे आपले महत्त्वाचे कर्तव्य आहे ह्याची लेखकाला पूर्ण जाणीव आहे हे सांगावयास नकोच. जेथे आजचे लोकप्रिय कादंबरीकार देखील हा लोकप्रिय तपशील नमूद करावयास आजही विसरत नाहीत तेथे १८६२ सालतील या नवलकथाकारांनी तो लक्षात ठेवून नमूद केला असल्यास त्यात नवल नाही; परंतु हा तपशील नमूद करिताना तो आपण का नमूद करीत आहोत यासंबंधीची त्यांची भूमिका अगदी स्वच्छ आहे. 'धाकटा कारकून' कथेच्या शेवटी खटल्याचा निकाल जाहीर होताच आपल्या कानांवर लेखकाचे पुढील शब्द पडतात, "वाचणारे महाराज ! आमची गोष्ट येथें पुरी जहाली. परंतु जशीं जा (ज्या) चीं कर्मे तशीं त्यास फळें प्राप्त जहालीं किंवा नाहीं ही शंका आपल्या मनांत राहील यासाठीं सांगतों कीं..." आणि मग हा लोकप्रिय तपशील नमूद होतो आणि अर्थात वाचकमहाराजांचे पूर्ण समाधान होते.

या दोन कथांमधील आरोपीतर्फेचे 'डिटेक्टिव्ह' वकील पहिल्या कथेतील त्यांच्या बंधूप्रमाणेच रहस्यशोधाच्या बाबतीत शेवटी कुचकामी ठरत असले तरी ते पहिल्या कथेतील नरसोपंत वकिलाइतके अगदीच निष्क्रिय वाटत नाहीत. ऐन खटला चालू व्हावयाच्या वेळी व चालू झाल्यावर न्यायाधीश, सरकारचे वकील, पंच व न्यायालयातील इतर स्त्रीपुरुष हे सर्व पहिल्या कथेतल्याप्रमाणे आरोपीबद्दल सहानुभूती व्यक्त करीत असताना दिसत असूनही त्यांचे हातपाय नरसोपंतांच्याप्रमाणेच लटपटतात, लटपटत नाहीत असे नाही; परंतु ते निदान आपणासमोर आलेल्या साक्षीदारांनी तपासणी आणि उलटतपासणी

मोठ्या कसोशीने व कौशल्याने घेताना दिसतात. रहस्याचा शोध लावण्याच्या बाबतीत ते जो थोडाफार प्रयत्न करिताना दिसतात तो ह्या साक्षीदारांच्या तपासणीत.

'पुत्रशोक' ह्या गोष्टीतील डिटेक्टिव्ह-वकील मात्र आपल्या इतर बांधवांपेक्षा थोडा वेगळा आहे. तोच तेवढा थोडाफार पुढे येणाऱ्या बाबूरावादी डिटेक्टिव्हांचा खऱ्या अर्थाने पूर्वज शोभतो. कारण खटला प्रत्यक्ष न्यायालयात येण्याच्या अगोदर त्याने आपल्या बुद्धिचातुर्याने गुन्ह्याचे धागेदुवे जुळवून रहस्याचा शोध लावण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. ह्यात तो आपल्यापेक्षा अधिक अनुभवी अशा एका वृद्ध वकिलाचा वेळोवेळी सल्ला घेताना दिसतो व त्या दृष्टीनेही त्याचे रहस्याचा शोध लावण्याबाबतचे प्रयत्न विशेष आस्थेवाईक व लक्षणीय वाटतात.

'पुत्रशोक' ही 'छायेची साक्ष'प्रमाणेच दोन बहिणींची कथा आहे; परंतु त्यांतील एक कुटिल व दुर्व्यसनी आहे, आपल्या बापाची मिळकत आपल्या नावे व्हावी म्हणून ती हरतऱ्हेच्या कारवाया करते. आपल्या धाकट्या बहिणीच्या प्रेमप्रकरणात आपण तिला मदत करीत आहोत असा आभास निर्माण करून बापाचे व तिचे वितुष्ट घडवून आणते, खोटीनाटी पत्रे लिहिते; परंतु शेवटी दैववशात धाकटी बहीण तिचा नवरा निवर्तल्यावर आपल्या लहान मुलांसह बापाच्या आश्रयाला आल्यावर तिचे व बापाचे सूत जमून वडील बहिणीची कारस्थाने उघडकीस येतात व बाप आपल्या मिळकतीचें वारसपत्र धाकटीच्या व तिच्या मुलाच्या नावे करून टाकतो. स्वाभाविकच वडील बहिणीचा क्रोध अनावर होतो व ती बापाच्या मृत्यूच्या वेळीं एका गुप्त दरवाजाने आपल्या धाकट्या बहिणीच्या खोलीत प्रवेश करून तिचे लहान मूल व वारसपत्र ही पळवून वाड्यामागील विहिरीत नेऊन टाकते. खोलीला कुलूप असता खोलीतील मूल व वारसपत्र ही नाहीशी कशी झाली ह्या रहस्याचा शोध वकिलसाहेबांना लावायचा असतो व ही गोष्ट खोलीला गुप्त दरवाजा असल्याशिवाय अशक्य आहे हे त्यांच्या लक्षात येते. तेवढ्यात धाकट्या बहिणीकडून वकीलसाहेबांना असेही कळते की काही वर्षांपूर्वी एकदा खोलीला आतून कडी लावलेली असताना तिची वडील बहीण अगदी अचानकपणे खोलीत आलेली तिच्या नजरेस पडलेली होती व मागच्या सज्ज्यातून जाणाऱ्या जिन्याने ती परत गेली होती; वकीलसाहेबांना

आणखी असेहि कळते की, त्या दुष्ट वडील बहिणीस रात्री झोपेत चालायची सवय आहे. हे सर्व कळल्यावर वकीलसाहेब आपला डाव रचतात. ते प्रत्यक्ष त्या दुष्ट बहिणीशी व तिच्या रानदांडग्या प्रियकराशी वादावादी करून आपणास त्यांच्या कारस्थानाचा जणू सुगावा लागला आहे असा आभास निर्माण करितात. ह्या वादावादीने निर्माण झालेल्या प्रक्षोभामुळे ती त्या रात्री झोपेत परत धाकटीच्या खोलीत प्रवेश करणार अशी त्यांची अपेक्षा असते व तेथे आल्यावर ती काय करिते हें पाहण्याच्या इराद्याने एका वैद्याबरोबर आणि घरातील मुनिमाबरोबर ते स्वतः धाकट्या बहिणीच्या झोपण्याच्या खोलीत रात्री पडद्याआड लपून राहतात आणि चमत्कार असा की वकीलसाहेबांचा तर्क शेवटी खरा ठरतो. वडील बहिणीच्या शयनमंदिरप्रवेशाचा हा प्रसंग लेखकाने मोठ्या मार्मिकपणे रंगविला आहे : मध्यरात्रीचे वातावरण, पडद्याआड श्वास निरोधून उभे राहिलेले वकीलसाहेब व त्यांचे सहकारी, पलंगावर भयभीत अवस्थेत पडलेली ती धाकटी बहीण व त्याच वेळीं भिंतीवरील आरसा पुढे पुढे सरकत येऊन त्याच्या आडून एखाद्या मद्यप्यासारखी झुकांड्या खात आलेली ती मोठी बहीण, हा सगळाच प्रसंग मोठा रोमांचकारक आहे व त्याचे तसेच चित्रण लेखकाने केले आहे. ते करीत असता लेडी मॅकबेथचे झोपेत उठून चालणे बहुधा लेखकाच्या डोक्यात असावे. मोठी बहीण खोलीत प्रवेश करते ती थेट धाकटीच्या पलंगाजवळ जाऊन त्यावरील एक गिरदी व पलंगाखालची एक वही घेऊन सज्जातील जिन्याने उतरून घरामागील पडक्या विहिरीत टाकते. तावडतोब वकीलसाहेब विहिरीत शोधाशोध करितात. विहीर पडीक असते. तिच्यात शेणमाती व कचरा टाकण्यात येत असल्यामुळे ती बरीचशी भरून आलेली असते; त्यामुळे तिच्यात टाकलेले मूल व वारसपत्र ही सुरक्षित असतात—अशा रीतीने वकीलसाहेबांनी आपल्या बुद्धिचातुर्याने रचलेला डाव यशस्वी होतो, रहस्याचा शोध लागतो व दुष्टाला योग्य ते शासन मिळून सुष्टाचा जय होतो.

ह्या चारीही कथा मूळ इंग्रजीतल्या असून त्यांना लेखकाने मराठी पेहराव चढविला असावा असा संशय आपणांस त्या वाचीत असता अनेकदा येतो, नाही असे नाही. परंतु एवढे खरे की, हा संशय रसभंगकारक ठरत नाही. मूळ इंग्रजी कथांना मराठी पेहराव चढविण्यात हा अनामिक लेखक खूपच यशस्वी झाला आहे; त्याने मूळ कथांचे मराठीत भाषांतर केले नसून त्यांच्या

गोष्टींचा केवळ सांगाडा घेऊन त्या संपूर्णपणे नव्याने मराठीत निवेदिण्याचा प्रयत्न केला आहे आणि म्हणूनच त्यांना सर्वत्र एक चांगली मराठी कळा आली आहे असे दिसून येते. त्यांच्या निवेदनाची पद्धतही खास त्या लेखकाची आहे. ती इंग्रजी नाही. तिच्यातील लकबा ह्या खास त्या लेखकाच्या लकबा आहेत. त्या काळातील 'मुक्तामाला', 'रत्नप्रभा' ह्या कथांतील भावदर्शना-प्रमाणेच ह्या कथांमधील भावप्रदर्शन हे वाचकांच्या मनावर पक्के ठसेल अशा बेताने अत्यंत ठळकपणे केले आहे. जेथे न्यायालयात न्यायाधीशांपासून तो सामान्य प्रेक्षकांपर्यंत सर्वांच्या मुखातून अधूनमधून बाहेर पडणारे 'हरहर!,' 'अरेरे', 'काय ही स्थिती!' ह्यांसारखे उद्गार लेखक काळजीपूर्वक नमूद करीत असतो तेथे प्रत्यक्ष दुःखाचा प्रसंग तो कसा वर्णन करीत असेल ह्याची कल्पनाच केलेली बरी. परंतु कल्पना करायची म्हटल्याने आजच्या मराठी वाचकास ती यथार्थपणे करिता येईलच असे नाही. तेव्हा त्या प्रसंगवर्णनाची थोडीशी चुणूक कळावी एवढ्यासाठी एकाच प्रसंगाचा केवळ निर्देश करितो. आपल्या धाकट्या मुलीसंबंधी आपले मन आपल्या वडील मुलीने कसे अकारण कलुषित केले हे जेव्हा व्यंकटस्वामींना अचानकपणे धाकटीकडून कळते तेव्हाची त्यांच्या मनाची स्थिती लेखकाने किती 'स्पष्ट' शब्दांत वर्णिली आहे पाहा : "काशी-बाईचें भाषण चाललें आहे तोच व्यंकटस्वामींनीं मोठ्यानें हाय हाय शब्द शब्द करून आरोळी मारली. त्यांचे नेत्र आरक्त झाले; सर्वांगास कंप सुटला आणि शरीर ज्वरानें तप्त होत चाललें." एवढे सांगितल्यावर व्यंकटस्वामींना झालेल्या दुःखाबद्दल वाचकांच्या मनात यत्किंचितही संशय राहणे शक्य आहे काय? त्या काळातील इतर सर्वच कथालेखकांच्याप्रमाणे ह्या रहस्यकथांच्या लेखकाच्या कोशाताही 'सूचकता' ह्या शब्दाचा अर्थ 'संदिग्धता' हाच असावा व ही संदिग्धता कोणत्याही स्वरूपात आपल्या निवेदनात येऊ न देण्याची लेखकाची स्वाभाविकच प्रतिज्ञा असावी. म्हणूनच सर्वच गोष्टी अगदी 'स्पष्ट' करण्याकडे लेखकाचे लक्ष असावे. सदर कथांचे हे वैशिष्ट्य खास 'मराठी' आहे व म्हणूनच त्याचे स्वरूप भाषांतरवजा नसून स्वतंत्र निवेदनात्मक असेच म्हणावे लागते.

ह्या सर्वच कथा लांबलचक आहेत. पहिलीने 'ज्ञानप्रसारका'ची बत्तीस पृष्ठे व्यापली आहेत; तर दुसरीचे दोन भाग असून ती 'ज्ञानप्रसारका'च्या तीन अंकांतून पुरी झाली आहे. 'हरवलेले रत्न' ही तिसरी कथा तर तीन

भागांची आहे व तिचा विस्तार एकंदर एकोणसाठ पानांवर झाला आहे. शेवटच्या कथेलाही पूर्ण होण्यास दोन अंक लागले आहेत. हा विस्तार होण्याचे कारण एकच व ते म्हणजे ह्या कथांचे अत्यंत संथपणे व ऐसपैसपणे झालेले निवेदन. त्या काळातील इतर कथानिवेदनाप्रमाणेच ह्या निवेदनातही घाई कशी ती नाही. त्याची पावले कधीही झपझप उचलत नाहीत. पात्रे एकमेकांशी बोलू लागली तरी संथपणे व भरपूर बोलतात. एका पात्राचे लांबलचक भाषण दुसरे पात्र शांतपणे ऐकून घेते व त्याला तितक्याच शांतपणे उत्तर देते. ह्या पात्रांच्या संवादांचे स्वरूप नाटकातील संवादांसारखे असते. संवादात अधूनमधून कंस घालून 'पत्र वाचतो,' 'घाबरून जात्ये व खाली पाहू लागत्ये,' 'हिसकाहिसक करितो' अशा नाटकातल्यासारख्या, पात्रांनी विशिष्ट विधानांच्या वेळी करावयाच्या किंवा केलेल्या हावभावांसंबंधीच्या सूचनाही दिलेल्या असतात. त्यामुळे कथा वाचीत असताच नाटक वाचीत असल्याचाही अधूनमधून अनुभव येत असतो. ही संवादलेखनाची 'नाट्यात्म' (की नाटकी ?) पद्धत ह्या कथांपुरती किंवा ह्या काळातील 'मुक्तामाला', 'रत्नप्रभा', 'वसंतकोकिला', 'विचित्रपुरी, ह्या कथाकादंबऱ्यांपुरतीच अवलंबिलेली आढळत नाही, तर थेट हरिभाऊ आपटे ह्यांच्या 'स्फुट गोष्टीं' पर्यंत म्हणजे १८९०–९५ पर्यंत अवलंबिलेली आढळते. संवाद हे आपले मुख्यांग नसून ते नाटकाचे मुख्यांग आहे, तेव्हा त्या अंगाचे स्वरूप नाटकात जसे असते तसेच येथे राहू देणे इष्ट आहे, ते अंग कादंबरीत आले तरी त्याचे हे मूळ रूप बदलण्याचे कारण काय, हे किंवा असल्या स्वरूपाचे तर विचार त्या काळातील कथालेखकांच्या मनात येत नसतील ना ? कथाकादंबऱ्यांतील संवाद नाटकातल्या संवादांपेक्षा प्रकृतीने थोडे वेगळे असतात व म्हणूनच त्यांचे लेखनही स्वभाविकच वेगळ्या प्रकारे झाले पाहिजे हा विचार, मला वाटते, हरिभाऊ आपट्यांच्या वेळी व नंतरच हळूहळू मराठी कथालेखकांच्या मनामध्ये रुजू लागला. त्याला खरे रूप आले ते गुर्जर-नाथमाधव-फडक्यांच्या काळात.

ह्या पहिल्या कथा ऐसपैस का आहेत याचे विवेचन करिताना हे थोडे गमतीदार विषयांतर झाले; परंतु त्या ऐसपैस आहेत ह्याला आणखी एक कारण, म्हणजे त्यांचा वाचकही ऐसपैस आहे, संथ आहे, कथा संपायला तीनचार अंकांचा – म्हणजे तीनचार महिन्यांचा अवकाश लागला तरी त्याची तक्रार

नाही, महिन्याच्या महिन्याला तो तिची वाट पाहायला तयार आहे. 'चालू कादंबरी'चे दिवस अजून तरी कोठे संपले आहेत? एवढेच नव्हे तर, ती जेवढी लांबेल तेवढी त्याला हवीच आहे. आपण ज्या कथेचा विचार करीत आहोत ती तर बोलूनचालून रहस्यकथा. तेव्हा ती झटकन संपू नये असे त्या, 'गुलबकावली' नंतर व 'आरबी भाषेतील सुरस व मनोरंजक गोष्टीं' नंतर एक निराळ्याच प्रकारची 'नवल' कथा वाचायला मिळालेल्या वाचकाला वाटले असणे अगदी स्वाभाविक आहे. ह्या वाचकाचे कथानकासंबंधीचे कुतूहलही सतत जागृत ठेवणे कथालेखकाला इतकेसे कठीण वाटत नाही; कारण हा वाचक थोडा बालवाचकासारखाच आहे. 'हरवलेले रत्न' सारख्या कथेत त्या दोन लहान मुलांच्या आपापसांतील बोलण्यावरून हरवलेल्या रत्नामागील रहस्य आरोपी मुलीच्या प्रियकराबरोबरच त्या कथेच्या वाचकालाही कळते व खरे म्हणजे त्याच्या दृष्टीने ती कथा तेथेच संपते असे लेखकाला वाटायला हवे. परंतु आपल्या 'वाचकमहाराजा'ची नाडी त्याने ओळखली आहे. एवढ्या 'सूचक' तपशिलाने आपल्या वाचकाचे लक्ष कथेवरून उडून जाणार नाही; सर्व खटला कोर्टात अथपासून इतीपर्यंत चालून गुन्हेगाराला शिक्षा झाल्याचे ऐकेपर्यंत आपला वाचक कथा खाली ठेवणार नाही ह्याची त्याला जणू खात्री आहे. त्यामुळे तो वाचकाला घाबरत नाही. वाचकाने केलेले सर्व तर्क फसावेत ह्याची काळजी आजचा चतुर गुप्तपोलिसी कथा लिहिणारा घेत असतो; तर आमच्या ह्या रहस्यकथांचा लेखक वाचकाचे कथेतील रहस्यासंबंधीचे सगळे आडाखे खरे ठरले तरी यत्किंचितही डरत नाही. आपला वाचक आपली कथा शेवटपर्यंत म्हणजे खऱ्या गुन्हेगाराला शिक्षा झाल्याचे कळेपर्यंत वाचणार ह्याविषयी जणू त्याला खात्री असते.

'नवल' ह्या नावाने मराठीत अवतरलेली पहिली रहस्यकथा ही अशी आहे. अजून रहस्यकथेचे असे तंत्र तिने हस्तगत केलेले नाही. तिच्यात गलथानपणा बराच आहे; क्रौर्य बेताचेच आहे; चाणाक्षपणाचे कौतुक एका मर्यादेपलीकडे नाही. तिचा विश्वास माणसाच्या बुद्धिचातुर्यापेक्षा परमेश्वराच्या न्यायीपणावर अधिक आहे. तिचे आवाहन तुमच्यामाझ्यामधील माणुसकीला आणि सत्प्रवृत्तींना आहे. म्हणूनच तिच्यात प्रतिबिंबित झालेली न्यायालयाची दृश्ये केवळ माणुसकीच्या भावनेने ओथंबलेली आहेत; म्हणूनच तिच्यात जिने उभे आयुष्य आपल्याशी दुष्टावा केला, आपल्या मुलाला विहिरीत फेकून देताना

जिने मागेपुढे पाहिले नाही त्या आपल्या दुष्ट वडील बहिणीसाठी धाकटी बहीण न्यायालयात शेवटी रदबदली करिताना आढळते व न्यायाधीशही ह्या माणुसकीच्या साक्षात्काराने विरघळून तिला फक्त दोन वर्षांची सौम्य शिक्षा देताना दिसतात. असे आहे म्हणूनच की काय कोणास ठाऊक, तिच्यातील नरसोपंत वकिलांसारखे 'डिटेक्टिव्ह' त्यांच्या बुद्धिचातुर्याने आपल्या डोळ्यात भरण्याऐवजी त्यांच्यातील माणुसकीच्या गहिवराने आणि पापभीरुत्वाने आपल्या सतत ध्यानात राहतात. ही कथा माणसाच्या ठिकाणी असणाऱ्या शोधक बुद्धीच्या मर्यादा जणू ओळखते : ह्या शोधकबुद्धीपेक्षा परमेश्वराच्या सर्वसाक्षित्वावरच तिचा विश्वास अधिक असल्यामुळे ती आपला शेवट बहुधा पुढील शब्दांनी करिताना आढळते: "अहाहा! परमेश्वरा, आम्ही पापी जन अनेक अपराध करीत असतांही आपण आम्हांवर दयाच करीत असावी ना! आम्ही आपले आभार मानून अनन्यभावानें शरण येऊन इतकेंच मागतों कीं, आम्हांस सदासर्वकाळ सद्बुद्धि देऊन आपले कृपेस पात्र करा."

परिशिष्ट दुसरे

# १८६३ मधील एक 'नाशिक पर्यटन'

मुंबईतील उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेच्या १८६२–६३ सालातील ६ व्या अधिवेशनाच्या वृत्तांतामध्ये रा. माधव नारायण शिरगांवकर यांनी 'नाशिक पर्यटन व त्याजवळची पांडवलेणी' ह्या विषयावर एक निबंध वाचल्याचा उल्लेख सापडतो. पुढे तोच निबंध 'नाशिकची सफर आणि तेथील विहारांचे वर्णन' ह्या नावाखाली सभेच्या 'मराठी ज्ञानप्रसारक' ह्या मासिकाच्या १८६३ सालातील मार्च महिन्याच्या अंकात छापलेला आढळतो. 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या संपादकीय धोरणानुसार सदर निबंधाच्या शिरोभागी किंवा शेवटी निबंधलेखकाचे नाव नसले तरी हा निबंध ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचला गेलेला रा. शिरगांवकरांचा निबंध होय, हे उघड आहे. निबंधाच्या शीर्षकामध्ये एके ठिकाणी 'पांडवलेण्यांचा' व दुसरीकडे 'विहारांचा' उल्लेख असला तरी प्रत्यक्ष निबंधात त्यासंबंधी काहीच माहिती पुरविलेली दिसत नाही; कदाचित सभेपुढे वाचून दाखविलेल्या मूळच्या निबंधात ही माहिती असून मासिकात तो निबंध छापताना मात्र संपादकांनी ऐन वेळी तिला कात्री लावलेली असावी.

कसेही असले तरी आहे त्या स्थितीत देखील सदर निबंध १८६३ सालातील नाशिकच्या प्रवासाची आणि नाशिक शहराची बरीच मनोरंजक माहिती आपणांस देतो. आज १९६० साली ही माहिती वाचताना तर फारच मौज

वाटते. शिरगांवकर हे कसलेले निबंधलेखक नव्हेत. त्यांनाही चांगलीच जाणीव आहे. 'नाशिक शहराचें इत्थंभूत वर्णन करण्यास बरीच फुरसद व चांगलें भाषाज्ञान हीं पाहिजेत', आपणाजवळ 'ह्या दोन्हीं गोष्टींचें साह्य नाहीं' हे त्यांनी निबंधाच्या प्रारंभीच स्पष्ट केले आहे व ज्ञानप्रसारक सभेचा एक सामान्य सभासद ह्या नात्याने आपण जे 'कित्येकांचे सुंदर व रसिक निबंध' ऐकले 'त्यांचा (च्या) बद्दल आपणांस जर मी कांहीं न ऐकविलें तर मी आपलें कर्तव्यकर्म केलें नाहीं असें होईल,' ह्या भावनेने त्यांनी हे आपले निबंधात्मक प्रवासवर्णन लिहिले आहे.

श्री. शिरगांवकर यांनी हे 'नाशिक पर्यटन' ईस्टरच्या सुटीत केले. १८६३ साली 'ईस्टर सणाची सुटी' दोन एप्रिलपासून सुरू होत असावी. कारण श्री. शिरगांवकर हे २ एप्रिल १८६३ रोजी 'सुमारें सवानऊ वाजतां बोरीबंदरला आगीच्या गाडींत' बसले ते प्रथम 'कल्याणास सुमारे साडेअकरा वाजतां जाऊन' पोचले. कल्याणला त्यांना गाडी बदलून नाशिकच्या गाडीत बसावे लागले, असे दिसते. कारण ते म्हणतात, 'या ठिकाणीं आगगाडीच्या रस्त्याचे दोन विभाग होतात. एक पुण्यास व दुसरा नाशिकास जातो. म्हणून कल्याण एथें पुण्याच्या गाडींतून उतरून नाशिकास जाणारी जी दुसरी गाडी तींत बसावें लागतें.' आपल्या प्रवासवर्णनात शिरगांवकरांनी ही नाशिकची गाडी गाठताना कल्याणला उतारूंची कशी 'धांदल उडत्ये' ह्याचे सविस्तर वर्णन केले आहे. 'अशा गलबल्यामध्यें कित्येकांच्या छत्र्या व कित्येकांचीं गाठोडीं हरवतात. पुण्याच्या गाडींतून उतरून नाशिकच्या गाडींत बसतांना प्रत्येक खेपेस एका उतारूचीही एखादी वस्तु गमावली नाहीं असा दिवस जात नाहीं', असे शिरगांवकर आवर्जून सांगतात.

श्री. शिरगावकरांना कल्याणहून "कसाऱ्या घाटाच्या पायथ्यास जास (ज्यास) 'रडतोंडी' असें म्हणतात तेथें' पोचण्यास दोन वाजले. कसारा घाटाच्या ह्या पायथ्यापर्यंत जेव्हा आगगाडीचा रस्ता नव्हता तेव्हा 'लोकांस जाण्यास फार आयास पडून डोळ्यांस टिपें येत; याकरितां या गांवास रडतोंडी' हे नाव पडले, असे ते सांगतात. शिरगांवकरांना येथे परत गाडीतून उतरावे लागले असे दिसते. १८६२।६३ साली कसारा ते इगतपुरी हा घाटातील लोहमार्ग झालेला नसावा. रडतोंडीगावाला उतरून उतारूंना घाट ओलांडण्यासाठी घोड्याची गाडी करावी लागे. ह्या गाडीचे वर्णन शिरगांवकरांनी बरेच

तपशीलवारपणे केले आहे. ते म्हणतात, 'आगीच्या गाडींतून उतरून उतारू स्टेशनचा (च्या) बाहेर निघाला म्हणजे त्यास तिकडे गाडीवाले मिळतात. ते प्रथम, महाराज, आपणांस गाडी पाहिजे कीं काय ? असा प्रश्न करितात. होय, असें उत्तर मिळालें म्हणजे माझी गाडी चांगली आहे, घोडे फार चपळ आहेत, आपल्यास वाऱ्यासारखे नेऊन टेमावर पोचवतील, अशा तऱ्हेची भूलथाप देऊन गिऱ्हाइकें अडवून त्यांस बरोबर घेऊन गाडीजवळ जातात. गाडी व तिचीं वाहनें पाहून हे गाडीवाले मोठे लबाड व ठक आहेत असें वाटसरूंना वाटूं लागतें. प्रत्येक मनुष्यास घाट चढण्यासाठीं गाडीभाडें आठ आणे द्यावें लागतें. या गाड्या दोन घोड्यांच्या असतात. दोन घोड्यांची गाडी म्हणतांच कित्येकांस त्या फैटणी, शिग्राम, अथवा ब्रूहम असावे असें वाटून भाडें फार कमी आहे अशी कदाचित मनांत कल्पना येईल,' ह्या भीतीने शिरगांवकरांनी आपल्या मुंबईकर वाचकांचा भ्रमनिरास करण्यासाठी ह्या घोडागाडीचे पुढे अधिक तपशीलवार वर्णन केले आहे. त्यांचे म्हणणे असे की, "या दोन घोड्यांचा (च्या) गाडीमध्यें व मुंबईचा (च्या) सामान भरण्याचा (च्या) खटाऱ्यांमध्यें भेद इतकाच कीं, या गाडीस बांबूच्या तट्या बांधून थोडीशी सावली केलेली असून खटाऱ्यापेक्षां कांहीं लहान असते, आणि बैलांबद्दल घोड्याचा (च्या) मानेवर जूं ठेवतात. मुंबईचा (च्या) खटाऱ्यांत बसून घाट चढलें तर कदाचित अधिक सुख होईल. कारण वर सांगितल्या गाडींत पाय मोकळे करून बसण्यास जागा पुरत नाहीं." अशा गाडीतून 'सुमारें सहा कोसाचा' कसारा घाट ओलांडताना कोणकोणते अनुभव आले, ह्याचे सुरस वर्णन ह्यापुढे वाचायला मिळेल अशी आपली अपेक्षा असते. परंतु शिरगांवकर आपल्या ह्या अपेक्षेचा भंग करितात; ते म्हणतात, 'अशा गाडींत बसून मी जें सुख भोगिलें त्या सुखासाठीं आपण माझा हेवा कराल या भीतीनें त्याचा विस्तार केला नाहीं."

रडतोंडीहून कसाऱ्याचा घाट ओलांडून शिरगांवकर हे 'विगतपुरी' ला आले व तेथे परत आगगाडीत बसले, असे दिसते. इगतपुरीपर्यंत घोडागाडीने घाट ओलांडून येण्यास त्यांना ४।५ तास लागले असावेत. इगतपुरीचे वर्णन ते फारसे करीत नाहीत; फक्त एप्रिल महिना असूनही 'त्या दिवशीं उष्णमापक यंत्र ७६° वर होतें' एवढा इगतपुरीच्या हवामानासंबंधीचा उपशील देताना ते दिसतात व इगतपुरीला आपणांस 'पाण्याचा फार दुष्काळ' आढळला हे

नमूद करितात. शिरगांवकरांची आगगाडी 'विगतपुरीहून सात वाजतां निघाली ती देवळाली म्हणजे नाशिक स्टेशनाजवळ सुमारे नऊ वाजतां जाऊन पोचली.' नाशिकच्या इतर उतारूंबरोबर शिरगांवकर हे देवळालीलाच उतरले. नाशिकचे वेगळे स्टेशन अद्याप तयार व्हावयाचे होते असे दिसते. कारण देवळालीला उतरून 'सुमारे तीन कोशांच्या अंतरावर' असलेले नाशिक शिरगांवकरांना 'कसाऱ्याप्रमाणें येथें ज्या गाड्या मिळतात' त्यांतील एका घोडागाडीत बसून गाठावे लागले.

देवळालीहून नाशिकला जात असताना शिरगांवकरांच्या प्रथम नजरेत भरली ती 'नाशिकची आंबराई.' 'आग्नेयीपासून ईशान्येपर्यंत एकसारखी आंब्याचीं झाडें लावलेलीं आहेत' असे ते मोठ्या हर्षाने नमूद करितात. 'नासरडी नदीपलीकडे नाशिकच्या रस्त्यावर दोन्ही बाजूंना शेराचें दाट कुंपण असून कुंपणांत कोठें कोठें बाभळींचीं झाडें आढळतात' एवढे सांगून ते थांबत नाहीत; तर त्यांची पिवळीं फुले, त्यांच्या अंगावरील पांढरे काटे, त्यांच्या पांढऱ्या शेंगा व त्या झाडांवर येणारा डिंक ह्याचेही तपशीलवार वर्णन करितात. बहुधा मुंबईतील आपल्या एलफिन्स्टन विद्यालयातील मित्रांनी बाभळीची झाडे पाहिलेली नसावीत व त्यांची उपयुक्तता त्यांच्या ध्यानात आलेली नसावी, अशीच त्यांची समजूत असावी; कारण केवळ बाभळीच्या चिकापासून डिंक तयार होतो, एवढे सांगून ते स्वस्थ बसत नाहीत तर "हा डिंक पौष्टिक आहे म्हणून बाळंतिणीस त्याचे लाडू करून देतात" ही माहिती देखील ते आपल्या ज्ञानपिपासू श्रोत्यांना झटकन पुरवितात. जेथे शिरगांवकरांच्या नजरेतून नाशिकच्या रस्त्यावरची शेराची व बाभळींची झाडे सुटत नाहीत, तेथे ह्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पसरलेले द्राक्षांचे मळे कसे सुटणार! ह्या 'पांढऱ्या द्राक्षांच्या मळ्यां'चे वर्णन ते खूपच समरसून करिताना दिसतात. हे वर्णन करिताना द्राक्षांचे वेल पांगाऱ्यावरच का चढविण्यात येतात, नाशिक येथील द्राक्षांमध्ये कोणकोणत्या जातीची द्राक्षे आढळतात, 'साहेबी' द्राक्षे कशी असतात, 'भोकरी' कशी दिसतात, 'साहेबी' द्राक्षांना 'साहेबी' हे नाव पडण्याचे कारण काय, इत्यादी प्रश्नांचा जेव्हा ते विचार करू लागतात, तेव्हा ज्या 'ज्ञानप्रसारक' सभेपुढे त्यांनी सदर निबंध वाचून दाखविला त्या सभेचें हरतऱ्हेचे ज्ञान मिळविण्यासाठी उत्सुक असलेले श्रोते आपल्या डोळ्यांपुढे दिसू लागतात. शिरगांवकरांच्या माहितीवरून नाशिकच्या 'साहेबी' द्राक्षांस

'साहेबी' हे नाव पडण्याचे कारण असे की, "साहेब म्हणजे मोठे लोक; त्यांस हीं फार प्रिय आहेत म्हणून त्यांस साहेबी असें नांव पडलें." शेवटी नाशिकला 'द्राक्षें मुंबईपेक्षा तिप्पट स्वस्थ (स्वस्त) मिळतात' ही माहिती पुरवून शिरगांवकर आपल्या मुंबईकर श्रोत्यांना नाशिककरांचा हेवा वाटावयास लावतात.

शिरगांवकरांचे 'नाशिक–पर्यटन' पुढे त्या शहराच्या प्राचीनत्वाकडे वळते. नाशिकचे नाव 'टाल्मीच्या भूगोल विद्येमध्ये' कसे आढळते, कृतयुगात त्याला पद्मनगर कसे म्हणत असत, द्वापारात ते जनस्थान कसे झाले, आणि शूर्पनखेच्या कथेमुळे कलियुगामध्ये ते नाशिक कसे झाले, ह्यासंबंधीची माहिती पुरवून मग ते प्रत्यक्ष शहराच्या वर्णनाकडे वळतात. ह्या वर्णनातील बराचसा भाग अर्थातच नाशिकच्या ब्राह्मणांच्या वर्णनानेच व्यापलेला आहे. तो मनोरंजक आणि माहितीपूर्ण आहे; तेव्हा तो त्यांच्याच शब्दांत दिलेला बरा. शिरगांवकर म्हणतात, "या शहराचा आकार धनुष्याकार आहे. वायव्येपासून ईशान्येपर्यंत गोदावरी नदी वाहते व ईशान्येपासून आग्नेयीपर्यंत नासरडी नदी वर्तुळाकार गेली आहे, आणि एका बाजूस जमीन आहे. नाशिक शहरांत परकीय कोणी आला म्हणजे त्यास प्रथम तेथील ब्राह्मण भेटतात. हे आपणास गंगापुत्र असें म्हणवितात. त्यांची परकीय गृहस्थांची गाठ पडतांच त्यांस त्यांचा पहिला प्रश्न हा असतो कीं, आपण कोठून आला व आपलें उपनाम काय? गांवाचें नांव सांगितलें म्हणजे त्यांचा (च्या) खतावणींत जी अनुक्रमणिका वर्णक्रमानें केली असते तींत त्या गांवाचें नांव आहे कीं नाहीं हें पाहून तो गांव मिळतांच त्याचा (च्या) त्या गांवचा (च्या) सदराखालीं जीं उपनामें असतात त्या उपनामांत हें नांव मिळतांच त्याचा (च्या) डाव्या बाजूस कीर्दपान व शक असतो. त्याप्रमाणें त्या सालची कीर्द काढून त्या कीर्दींत जो लेख असतो तो त्या गृहस्थास वाचून दाखवितात."

परंतु एवढेच सांगून शिरगांवकर थांबत नाहीत. कीर्दीतील ह्या लेखाचे स्वरूप कसे असते हे पुढे सांगतात. ते म्हणतात, 'सदरहू लेख खाली लिहिल्या प्रकारचा असतो :

> "वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री गोविंदभटजी विश्वामित्रे मुक्काम जनस्थान स्वामीचे सेवेशी विद्यार्थी गोविंद विष्णु टिळक, तीर्थरूप विष्णु रामचंद्र, मातोश्री अन्नपूर्णाबाई, चुलते श्रीधर रामचंद्र, कृष्णाजी रामचंद्र, व वामन रामचंद्र; वरिष्ठ बंधु सदाशिव विष्णु कनिष्ठ बंधु

रघुनाथ विष्णु, पुतण्या माधव व रघुनाथ, गोत्र कौंडण्य, रहाणार मौजे अरवली उर्फ आजगांव, कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विनंती विशेष. मी श्री जनस्थान एथें येऊन आमचे जुने लेख पाहून आपल्या मार्फतीनें तीर्थविधी वगैरे केला आणि आपणांस आमचें उपाध्यायपण दिलें आहे. तर जे कोणी आमचे वंशज येतील त्यांणीं आपणांस व आपल्या वंशजांस गुरू मानून आपल्या मार्फतीनें धर्मसंबंधीं सर्व विधी करावे. कळावे. बहुत काय लिहिणें. लोभ असावा ही विनंती. मिती वैशाख शुद्ध ८ मी शके १७१९"

नाशिकला शिरगांवकर कोणा उपाध्यायाकडे उतरले ह्याची नोंद नाही. परंतु ह्या क्षेत्रोपाध्यायांचे त्यांनी बरेच जवळून अवलोकन केल्यासारखे दिसते. हे क्षेत्रोपाध्याय वर दिलेल्या लेखांसारखे लेख मिळविण्याकरिता 'किती लांब लांब जातात' ह्याचे वर्णन त्यांनी केले असून एका कुळातील दोनतीन लेख निरनिराळ्या उपाध्यांकडे गुंतलेले आढळल्यास पंच जमवून 'ज्याचा (च्या) जवळ जुना लेख असेल तो कायम करून नवे रद्द' कसे करितात हे त्यांनी सांगितले आहे. नाशिकमधील ह्या ब्राह्मणांमध्ये शिरगांवकरांना 'लोभबुद्धी' आढळली. ते म्हणतात, 'हे ब्राह्मण लोभी आहेत. त्यांत यजुर्वेदी तर फारच. या लोकांची लोभबुद्धी फार निंद्य आहे. एखादा मृत पशु पाहातांच गिधाडें त्याचा (च्या) वर एकदम उडी घालून त्यास फाडून खातात, त्याचप्रमाणें हे लोक आपल्या गिऱ्हाइकाची दशा करितात.' नाशिकच्या ब्राह्मणांच्या ह्या 'लोभ-बुद्धी'बरोबरच त्यांच्या फुकटखाऊपणाचे आणि अधाशी वृत्तीचेही चित्र शिरगांवकरांनी रंगविले आहे. ते लिहितात, "इथें फुकट जेवणाऱ्या ब्राह्मणांस एकही दिवस स्वतः जेवण करायास नको; कारण दररोज कोठें नाहीं कोठें शेदोनशें पात्रांचें प्रयोजन होतेंच. 'दुर्गेची होळी, वाजंत्र्याची नळी आणि पुणार्ची पोळी' होत नाहीं असा दिवस जात नाहीं असें सांगतात." येथील ब्राह्मणांच्या खाबूपणासंबंधी बोलत असता शिरगांवकरांनी सांगितलेली पुढील हकीकत मोठी मनोरंजक आहे: 'अहिल्याबाई होळकर या एक वेळ नाशिकास आल्या होत्या. त्यावेळीं त्यांनी बुंदीचा (च्या) लाडवांचें भोजन घातलें होतें. ब्राह्मणांनीं सर्व जेवण आटपून मागचा भात जेऊन उठायचा (च्या) संधीस बाईसाहेब या येऊन सर्व ब्राह्मणांस हात जोडून म्हणाल्या कीं, "मी नाशिकचा (च्या) ब्राह्मणांची जेवणाविषयीं फार कीर्ति ऐकली होती, परंतु प्रत्यक्ष डोळ्यांनीं

पाहतां तसा एकही ब्राह्मण दृष्टीस पडत नाहीं" असे बोलून बुंदीचा (च्या) लाडवांनीं भरलेली एक टोपली आणवून लाडू वाढण्यास हुकूम केला. त्या वेळीं त्यांतील एक ब्राह्मण "राम भटजी, कशास लाडू घालतां? आतां लाडू खाल्ले म्हणून बक्षीस का मिळायचें आहे?" असे म्हणाला. हें ऐकून बाईसाहेब पुढें सरसावल्या आणि म्हणाल्या, "आपण जितके लाडू खाल तितके रुपये आपणांस इनाम देईन." तेव्हां ब्राह्मणानें प्रत्युत्तर केलें कीं, "एक रुपया कोणी तरी देईल. आपण प्रत्येक लाडवास, एक बिघा जमीन इनाम द्याल तर मी लाडू खाईन." असें ऐकून बाईसाहेबांनीं त्या ब्राह्मणाचें बोलणें कबूल केलें. त्या वेळीं त्या ब्राह्मणानें २४० लाडू खाल्ले. नंतर वचनाप्रमाणे बाईसाहेबांनीं त्यास २४० बिघे जमीन इनाम दिली व त्या सनदेंत हेंच इनाम देण्याचें कारण लिहिलें आहे." शिरगांवकरांना ही सनद पाहण्याची स्वाभाविकच फार इच्छा होती व ज्या गृहस्थाने त्यांना वरील हकीकत सांगितली तो सदर 'इतिहासप्रसिद्ध भटजीचा खुद्द नातूच' होता; परंतु ही सनद सदर गृहस्थांच्या चुलत्यांकडे असल्यामुळे व शिरगांवकर त्याचेकडे गेले असता तो घरी न भेटल्यामुळे त्यांची ही इच्छा अतृप्तच राहिली.

"'श्रावणांत तट्ट, भादव्यांत भट्ट' अशी जी म्हण आहे त्यांतून भादवा काढून सिंहस्थ घातलें असतां ही म्हण नाशिकचा (च्या) ब्राह्मणांविषयीं यथायोग्य होईल' असे शिरगांवकर सांगतात. 'जसे चातक पक्षी पर्जन्याची वाट पाहतात त्याप्रमाणें नाशिकचे ब्राह्मण सिंहस्थाची वाट' कशी पाहत असतात ह्याचें वर्णन करून 'सिंहस्थांत ब्राह्मण लोकांची चंगाळी होती' असे विधान ते करितात. नाशिकमधील एकंदर १५००० घरांपैकीं ५००० ब्राह्मणांची असून त्यांत ५०० यजुर्वेद देशस्थ ब्राह्मणांची आणि बाकीच्या ४५०० ऋग्वेदी, कऱ्हाडे, चित्पावन ब्राह्मणांची' आहेत व ह्या ब्राह्मणांत 'वैदिक फार, विद्वान-शास्त्री फार थोडे' हे ते नमूद करितात. नाशिकच्या ब्राह्मणांसंबंधीचे त्यांचे पुढील विधान मात्र मोठे मार्मिक आहे. ते म्हणतात, "इकडील ब्राह्मण लोक कोकणांतील ब्राह्मणांसारखे इतर जातीचा तिरस्कार करीत नाहींत. याचें कारण ते दिलदार आहेत असें नव्हे; परंतु पैशाच्या लोभामुळे लोकांस नाखूष केल्यास आपलें हित साधणार नाहीं; यास्तव हे लोकांशीं मन मिळून असतात असें वाटतें."

नाशिकच्या ब्राह्मणांच्या मानाने प्रत्यक्ष शहराचे शिरगांवकरांनी केलेले वर्णन अगदी बेतास बात आहे. अर्थात नाशिकातील गोदावरीच्या पात्रातील कुंडांचे वर्णन ते शिरगांवकर काय करणार? ह्या सर्व कुंडांची नावे, त्यांचे माहात्म्य, त्यात स्नान केले असता कोणकोणती पापे नाहीशी होण्याची शक्यता असते, ह्याचेच ते वर्णन करणार. ते वर्णन त्यांनी केले आहे व ह्या कुंडांबरोबरच तेथील देवळांचीही नावनिशी त्यांनी दिली असून शेवटी 'महादेवाचा (च्या) लिंगांची तर गणनाच नाही. नदीचा (च्या) घाटावर जागोजागीं लिंगेंच लिंगें आहेत' एवढे सांगून ते मोकळे झाले आहेत. नाशिकमधील देवळांची रचना, त्यांचा काल, त्यांची वास्तुकलेच्या दृष्टीने असणारी वैशिष्ट्ये ह्यात शिरगांवकरांस अर्थात फारसे गम्य नाही व फारसा रसही नाही. सर्व प्रमुख देवळांची नावे ओळीने नमूद केल्यावर त्यांना अर्थात ह्या देवालयावरील कलाकुसरीची आठवण होते; नाही असे नाही. परंतु 'या देवालयांपैकीं श्रीरामाचें देवालय व नारोशंकराचें देवालय यांचीं नकसी कामें फार चांगलीं आहेत' एवढा शेरा मारून ते आपले काम भागवितात. वास्तुकलेत त्यांना बिलकुल रस नसल्यामुळेच बहुधा त्यांनी दिलेल्या देवळांच्या यादीत अगदी बाणेश्वर, विठोबा, गंगामाहेर, मुरलीधर, इत्यादी लहानसहान मंदिरांस स्थान मिळताना दिसते, परंतु नाशिकच्या वास्तुकलेचा एक नमुना म्हणून प्रसिद्ध असलेल्या सुंदरनारायणाच्या मंदिराला मात्र कोठेच स्थान मिळत नाही; अर्थात नाशिकच्या सीतागुंफेचे वर्णन मात्र शिरगांवकरांनी अगदी तपशीलवारपणे केले आहे. सुंदर–नारायणाच्या वास्तुकलेकडे जरी शिरगांवकरांचे लक्ष गेलेले नसले तरी ही सीतागुंफा पाच वडांजवळ कशी आहे, ती सपाटीपासून 'सुमारे सात हात ओंड' कशी आहे, तिच्या दारात बसलेला बैरागी 'दिवा दाखविण्याच्या मिशानें' यात्रेकरूंकडून एक एक दिडकी कशी घेतो. ह्या गुंफेत शिरण्याच्या 'दीड हात रुंद व दोन हात उंच' पारात आपल्याबरोबर असलेला 'शागिर्द' 'बराच स्थूल' असल्यामुळे मध्येच कसा अडकला, ह्या खोलीत गेल्यावर गर्दी कशी होते व त्यामुळे आपणांस 'आंगांतील सर्व कपडे' कसे काढावे लागले, ह्याचे वर्णन करण्यात ते अगदी मनापासून रंगून गेलेले आहेत.

नाशिकच्या मंदिरांची आणि कुंडांची माहिती पुरविल्यावर शिरगांवकर तेथील पेठांची नावे सांगतात. त्यावरून १८६२–६३ साली नाशिकमध्ये आदितवार, सोमवार, मंगळवार, आणि बुधवार एवढ्या चारच पेठा होत्या व काजीपुरा व

कागदीपुरा हे दोन पुरे होते अशी माहिती मिळते. 'कागदीपुऱ्यांत जुनरी कागद उत्पन्न होतात. नाशिकास रुप्याचीं, तांब्याचीं व पितळेचीं भांडीं फार चांगलीं तयार होतात. या तऱ्हेचीं सुंदर व झिलईदार भांडीं महाराष्ट्र देशांत दुसऱ्या ठिकाणीं होत नाहींत.' हे सांगून शिरगांवकर नाशिकला भरणाऱ्या बाजाराकडे वळतात. आजच्याप्रमाणे १८६२–६३ साली देखील नाशिकचा 'धान्यांचा व गुरांचा बाजार' बुधवारी व शनिवारी भरत होता, असे त्यांनी पुरविलेल्या माहितीवरून दिसून येते. "नाशिकच्या बहुतेक गल्ल्यांतील रस्त्यांवर फरसबंदी केली आहे. एथे पेशवे व त्यांचा (च्या) पदरचा (च्या) सर्व लोकांनी मोठमोठे वाडे बांधले आहेत. त्या वाड्यांतून श्रीमंतांचा वाडा फार मोठा असून त्याचें काम फार चांगलें केलें आहे व. त्याचा (च्या) दगडांवर पुष्कळ श्रम घेतला आहे, हें स्पष्ट दिसतें. कारण हा वाडा इतका जुना झाला नसून त्या दगडांत आपलें स्वरूप दिसतें." नाशिकमधील सरकारवाडा किंवा चोपडावाडा म्हणून आजही प्रसिद्ध असलेल्या वाड्यासंबंधीची वरील माहिती पुरवून शिरगांवकर असे सांगतात की, "या वाड्यांत सध्या सब्‌कलेक्टरची कचेरी, फौजदार कचेरी, इंग्रजी शाळा, पुस्तकालय वगैरे ऑफिसें आहेत." आजही ह्या इतिहासप्रसिद्ध वाड्यांत फौजदार कचेरी आहेच; आणि वरच्या मजल्यावर १९४० साली ज्या वाचनालयाने आपली शंभरी पुरी केली ते 'सार्वजनिक वाचनालय' आहे. १८६३ साली ही 'नेटिव्ह जनरल लायब्ररी'च होती व तिला जेव्हा शिरगांवकरांनी भेट दिली तेव्हा 'पुस्तकालयांत एकंदर सुमारें १०० पुस्तकें आहेत, भिंतीवर चेंबर्सचे नकाशे टांगले आहेत. इंग्रजी वर्तमानपत्रांपैकीं टाइम्स् ऑफ इंडिया हें मात्र एक पत्र येत असतें' एवढाच तत्संबंधीचा तपशील शिरगांवकरांच्या नजरेने टिपला होता.

शिरगांवकरांचे 'नाशिक पर्यटन' एवढी माहिती पुरवून संपते. त्यांत प्रवास-वर्णनाची चातुरी नाही. ते बरेचसे सरधोपट व काहीसे विस्कळीत पर्यटनवृत्त आहे. त्याच्यामागची वृत्ती केवळ ज्ञानसंग्राहकाची व ज्ञानप्रसारकाची आहे. शिरगांवकरांच्या वाचकानेही जग फारसे पाहिलेले नसल्यामुळे त्याला 'नाशिक पर्यटन' वृत्तामध्येही निश्चित अपूर्वाई वाटली असली पाहिजे. ही अपूर्वाई खुद्द लेखकाला सदर प्रवासानुभवात वाटली हे मात्र उघड आहे. शिरगांवकरांच्या निवेदनातून हे जाणवल्याखेरीज राहात नाही. ह्यातच ह्या ओबडधोबड प्रवासवर्णनाचे यश आहे. आज आपणास हे प्रवासवृत्त वाचताना जो आनंद

होतो त्याच्या बुडाशी १८६३ सालातील नाशिक डोळ्यांपुढे आल्याने होणाऱ्या आनंदाचा जसा वाटा आहे, तसाच ज्या ओबडधोबड भाषेत एक प्रकारच्या निर्व्याज्य मनाने लेखकाने प्रवासवृत्त लिहिले आहे, त्या अकृत्रिम वृत्तीच्या अपूर्वाईचाही मोठा भाग आहे.

परिशिष्ट तिसरे

## कनकेश्वराची भेट

मुंबईचे दक्षिणेस सुमारे दहा कोसांवर कनकेश्वर म्हणून एक स्थान अलिबाग प्रांतात आहे. तेथील हवा थंड म्हणून उन्हाळ्यात राहाण्यास ते ठिकाण फार चांगले आहे. आमचा एक मित्र एके वर्षी उष्णकाळात काही दिवस राहाण्यास तेथे गेला होता. त्याने पुढील हकीकत लिहून दिली आहे.

मे महिन्याचे पहिले तारखेस आम्ही कनकेश्वरास जावयास निघालो. तरीतून मांडव्यास असा आमचा पहिल्याने बेत होता. परंतु तरीत फार दाटी होती म्हणून आम्ही आपल्या आठदहा मनुष्यांकरिता निराळी होडी केली. भाऊचे धक्क्यावर आम्ही होडीत बसलों. तीन तासात आम्ही मांडव्यास जाऊन पोहोचलो. तेव्हा संध्याकाळचे पाच वाजण्याचा सुमार झाला होता. तेथे भाड्याच्या गाड्या करून रात्री सुमारे आठ वाजता कनकेश्वराचे डोंगराच्या पायथ्याशी एक गाव आहे तेथे आलो. रात्रीचे रात्र तेथे राहून दुसरे दिवशी प्रातःकाळी डोंगर चढून वर गेलो. एथे वर चढण्यास रस्ता चांगला आहे. चिरेबंदी पायऱ्या बांधून काढल्या आहेत. परंतु गाड्या वर जावयाच्या नाहीत. ओझ्यांची घोडी देखील जात नाहीत. ओझी नेण्यास आम्ही मजूर केले होते. चढण चांगली एक पक्का कोस आहे.

वर लहानसे मैदान आहे व तेथे थोडी वस्ती आहे. मध्यभागी कनकेश्वराचे देऊळ आहे व त्याचे सभोवती चार पाच घरे व दोन चांगल्या धर्मशाळा व

दहावीस झोपड्या अशा आहेत. या दोन धर्मशाळांपैकी एकीच्या मालकापासून चिठ्ठी घेऊन जाऊन आम्ही तीत उतरलो होतो. ती धर्मशाळा फार चांगली बांधलेली आहे, त्यामुळे जागेचे आम्हास तेथे फार सुख झाले.

ही वस्ती डोंगराचे पश्चिमेकडील टोकावर आहे. कनकेश्वराचे देऊळ लहानसेच आहे. ते दगडाचे असून जुने हेमाडपंती तऱ्हेचे आहे. पुढे सभामंडप आहे तो अलीकडील बांधलेला आहे. त्यात जागा फार संकोचित आहे. देवळात मध्यभागी पिंडी असून तिचे मध्यभागी एक खोलगा आहे. त्यात देवास पूजा वाहतात. देवळाचे पाठीमागे एक मोठे चिरेबंदी बांधलेले तळे आहे. त्यात आठ महिने विपुल व चांगले पाणी असते असें म्हणतात. परंतु आम्ही गेलो होतो तेव्हा उन्हाळ्यात तर पाणी अगदी तळास गेले होते व त्यास नीळ आली होती. या तळ्यात बहुधा धूत नसत परंतु आत स्नान करण्यास मनाई नसे. तेथील लोक फडक्याने पाणी गाळून पाणी पीत. आमची मनेषा त्याकडे धावत नसे. कनकेश्वराचे खर्चाकरिता आंग्रे सरकार यांनी एक गाव इनाम करून दिला आहे. तो तेथून जवळच आहे. त्या गावचे वसुलाची व्यवस्था करण्यास इंग्रज सरकारने पंच नेमले आहेत. ते तलाठ्याकडून वसुलवासलात करवितात; व देवाचे नेमणुकीची व्यवस्था ठेवितात. देवाची समंत्र पूजा करण्यास पुजारी ब्राह्मण आहे, त्यास वेतन आहे. त्याचप्रमाणे साधी पूजा करण्यास गुरव आहे. सकाळ-संध्याकाळ चौघडा वाजविण्यास गुरव आहेत. रात्री देवापुढे गायन करण्यास गवई आहे. या सर्वांस वेतने आहेत परंतु ती फार थोडी यामुळे त्यांची नौकरीही देणावळीप्रमाणे आहे. साधु, बैरागी, गोसावी व ब्राह्मण येतील त्यांस सरकारनेमणुकीकडून तीन दिवस शिधा मिळतो; ही सर्व सरकारी व्यवस्था पाहाण्यास सदरी लिहिलेल्या तलाठ्याच्या मार्फत एक कारकून तेथे आहे.

तेथे दुकाने वगैरे काही नाहीत त्यामुळे धान्य, भाजी वगैरे जिन्नस डोंगराचे पायथ्याचा गावातून आणावा लागतो. परंतु डोंगरावर चारा फार त्यामुळे दूध मिळते. तेथे रान पुष्कळ त्यामुळे सरपणाचीही तेथे समृद्धी आहे. डोंगराखालील गावात साधारण सर्व जिन्नस मिळतो. आलीबाग तेथून साडेचार कोस आहे; तेथे बहुधा हवे ते मिळते.

सरकारी अन्नछत्राखेरीज दुसरे एक आहे तेथेही आतिथ्यास तीन दिवस शिधा मिळतो. हे अन्नछत्र आम्ही ज्या धर्मशाळेत राहिलो होतो तिच्या मालकाचे आहे. तो मुंबईतील एक लक्षाधीश सावकार आहे.

कनकेश्वराची हवा थंड असून निरोगी आहे. मे महिन्यात आम्हास तेथे कधी साधारणतः घाम आला नाही. फार व्यायाम किंवा विशेष श्रम केले तर मात्र घाम येई; उन्हाळ्यात मुंबईत हातपाय गळून जातात व काही काम होत नाही त्याप्रमाणे तेथे कधी होत नसे. समुद्राकडून पश्चिमवारा नेहमी वाहत असे. अन्न चांगले पचन होई. तेथील पाणी फार चांगले आहे असे नाही. वर सांगितलेले तळयाचे पाणी वस्तीत आहे त्यामुळे नजीक आहे; परंतु ते पाणी निर्मळ नाही. वस्तीपासून सुमारे एका गोळीचे टप्प्यावर उत्तरेस एक गायमुख आहे त्यातून निर्मळ पाणी येते. परंतु ते पाणी विपुल नाही. उन्हाळ्यात धार अगदी कमती होऊन थेंब थेंब पडते. देवळापासून या गायमुखापर्यंत चिरेबंदी पायऱ्या आहेत त्यामुळे जाण्यायेण्यास बरे पडते. वस्तीपासून पूर्वेस सुमारे दीड गोळीचे टप्प्यावर आणखी एक पाण्याचे टाके आहे. त्याचे पाणी चांगले आहे; व ते आटत नाही असे सांगतात. परंतु या टाक्याचा रस्ता बिकट असून वाटेत फार झाडी आहे; पाण्याचे ठिकाणी फारच निबिड दाटी झाडांची आहे. तेव्हा तेथे एकटेदुकटे किंवा भलते वेळेस जाण्याचा उपयोग नाही. याकरिता या टाक्याचा लोकांस तादृश उपयोग होत नाही.

कनकेश्वराचे डोंगरावरून देखावा उत्कृष्ट दिसतो. पश्चिमेचे बाजूस तीन कोसांवर विस्तीर्ण समुद्र दिसतो. डोंगराचे पायथ्यापासून तो समुद्रकिनाऱ्यापर्यंत सारखे मैदान आहे. त्यांतील लहान लहान खेडी, चित्रविचित्र रंगाची शेते, व समुद्रास मिळणाऱ्या नद्यांचा नागमोडी यांना पाहून मनास घटकाभर आल्हाद वाटतो. समुद्रात किनाऱ्यापासून जवळच असे खांदेरीउंदेरीचे किल्ले दिसतात त्या किल्ल्यांचे अमळ दक्षिणेस आलीबाग व तेथील किल्ला ही आहेत. तीही दिसतात. उत्तर टोकाशी उभे राहिले म्हणजे मुंबई व उरणचा डोंगर ही दिसतात. वाळुकेश्वर, कुलाबा, कोट व ब्याकबे ही चांगली ओळखता येतात. पूर्वेकडेस पनवेल, पेण व नागोठणे यांच्या खाड्या दिसतात. नागोठण्याचा खाडीस इतक्या बारीकसारीक खाड्या मिळाल्या आहेत की तेथें जसे काय नद्यांचे जाळे विणले आहे असे वाटते. दक्षिणेचे बाजूस, पश्चिमेस जसे मैदान आहे त्याप्रमाणेच आहे; पण पुढे समुद्र नाही, तर मोठाले दोन डोंगर आहेत. तेथे दृष्टी थांबते.

कनकेश्वराचे डोंगरावर झाडी पुष्कळ आहे व अनेक प्रकारची झाडे आहेत. कित्येक ठिकाणीं झाडी इतकी दाट आहे की भर दोनप्रहरीं आत चांगला

